








नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ पुरस्कृत
प्राज्ञपाठशाला मंडळ वाई, संचालित मासिक



# नवभारत

वर्ष ३२। अंक २। नोव्हेंबर १९७८
किंमत २ रुपये। वार्षिक वर्गणी १८ रुपये



कार्यालय
प्राज्ञपाठशाला मंडळ
वाई, जि. सातारा

अनुक्रमणिका







# नवभारत

नोव्हेंबर १९७८

## अनुक्रम



## लेखक-परिचय

☐ **कमलाबाई टिळक :** इंग्रजीच्या सेवानिवृत्त, प्राध्यापिका ( बनारस व बडोदा विद्यापीठ ) व लेखिका; मुंबई. ☐ **अनिल जोशी :** वार्ताहर 'केसरी' व अध्यापक, वाई हायस्कूल, वाई. ☐ **रा. चिं. ढेरे :** मराठी साहित्याचे ख्यातनाम संशोधक व समीक्षक, पुणे. ☐ **वि. म. दांडेकर :** प्रख्यात अर्थशास्त्रवेत्ते व गोखले अर्थशास्त्र संस्थेचे संचालक, पुणे. ☐ **वसंत स. जोशी :** मराठीचे प्राध्यापक, व विभाग प्रमुख, कला–वाणिज्य महाविद्यालय, वाई.

## दीपावली शुभेच्छा

ही दिवाळी व नवे वर्ष आमच्या लेखकांना, वर्गणीदाराना, जाहिरातदाराना व 'नवभारता'स विविध प्रकारे अगत्यपूर्ण सहकार्य देणाऱ्या हितचिंतकांना सुखसमृद्धीचे जावो !





## संपादकीय—

### इतिहासाचे ओझे—

अथेन्स जेव्हा संस्कृतीच्या शिखरावर तळपत होते तेव्हा त्याच्यात जेवढे स्वतंत्र नागरिक होते त्याच्या चौपट गुलाम होते. ह्या गुलामांचे आजचे वंशज कुठे असतील ? पेरिक्लिस आणि प्लेटो-नंतर खूप इतिहास उलटून गेला आहे. मॅसिडोनिअन, रोमन, तुर्की साम्राज्ये फोफावली आणि कोसळली, अनेक सैन्ये ग्रीसच्या भूमीवरून आरपार कूच करीत गेली. हा सर्व प्रदेश अनेकदा ढवळून निघाला. पण सामान्यपणे असे म्हणता येईल की प्राचीन ग्रीक गुलामांचे आजचे बहुसंख्य वंशज शेतांवर, कारखान्यांत, वहातुकीच्या साधनांवर रावत असणार. काही बाबतीत त्यांची सर्वसामान्य स्थिती त्यांच्या पूर्वजांच्या स्थितीपेक्षा सुधारलेली असेल आणि कदाचित् काही बाबतीत अधिक बिकट झालेली असेल. पण ह्या वंशजांपैकी काही व्यक्ती आपल्या मध्यंतरीच्या पूर्वजांच्या प्रयत्नांमुळे आणि सुदैवामुळे सामाजिक शिडीवर बरेच वर चढलेल्याही असतील. पण ह्या सर्वांच्या बाबतीत एक गोष्ट निश्चितपणे घडून आली आहे. प्राचीन ग्रीक गुलामांचे वंशज म्हणून ते आता स्वतःला ओळखीत नाहीत. ही ओळख आता प्राचीन इतिहासात पार लुप्त होऊन गेली आहे. त्यांच्या स्वतःच्या 'अस्मिते'च्या ( identity ) दृष्टीने, त्यांची आजची सामाजिक परिस्थिती, सामाजिक भूमिका ह्यांच्या दृष्टीने ती आता पूर्णपणे निरर्थक आहे. आज सुस्थितीत असलेल्या एखाद्या व्यक्तीचा वंशवृक्ष रेखाटत नेला असता तिचा पूर्वज एक गुलाम होता असे आढळून आले तर ह्यामुळे ती व्यक्ती विचलित होण्याचे काही कारण नाही. ती तशी होणार नाही. स्वतःच्या कुळाविषयीची काहीशी कुतूहलजनक माहिती उघडकीला आली आहे एवढीच तिची प्रतिक्रिया होईल. कदाचित् आपल्या कुळाचा पूर्वेतिहास रोमँटिक आहे ह्या कल्पनेत ती काहीसा आनंद मानील. ह्या माहितीचे तिला शल्य वाटणार नाही.

आज इंग्लंडमध्ये सार्वत्रिक शिक्षण आहे आणि पन्नास वर्षांपूर्वीच्या काळाशी तुलना केली तर समाजाच्या सर्व थरांत आज शिक्षणाची समान संधी बऱ्याच प्रमाणात उपलब्ध आहे. आज ऑक्स्फर्ड किंवा केंब्रिजचा एखादा 'डॉन' मध्ययुगीन इंग्लंडमधील एखाद्या 'बांड्समन'चा वंशज असणे शक्य आहे. पण बाँड्समनचा वंशज हा शिक्का त्याच्यावर असत नाही. पण स्मृतिग्रंथांत ज्यांचा 'चांडाल' किंवा 'अंत्यज' म्हणून निर्देश झालेला आहे त्या जमातीतील आजच्या व्यक्ती आजही अस्पृश्य म्हणून ओळखल्या जातात आणि वागविल्या जातात. महार किंवा मांग जातीतील एखाद्या व्यक्तीचा आज संस्कृतभाषेत निर्देश करायचा असेल तर त्यासाठी ह्या किंवा समानार्थी शब्दांचा वापर अपरिहार्यपणे करावा लागेल. अस्पृश्य असणे हा ह्या व्यक्तींच्या सबंध सामाजिक व्यक्तिमत्त्वाला व्यापणारा विशेष आहे.

एखादी आधुनिक युरोपीय व्यक्ती जेव्हा प्लेटोचे संवाद वाचते, पेरिक्लिसने अथेन्सच्या लोक-शाहीचे, 'खुल्या समाजा'चे ( open society ) वाचते तेव्हा सामान्यपणे अथेन्समधील गुलाम तिच्या दृष्टिआड झालेले असतात. ह्या गुलामांच्या श्रमावर, शोषणावर अथेन्सची संस्कृती आधारलेली होती हे तिला माहीत नसते असे नाही. अथेन्सच्या सांस्कृतिक कामगिरीचे कौतुक करणाऱ्या व्यक्तींना ही सामाजिक घडण अन्यायाची नाही असे वाटत असते असेही नाही. गुलामगिरीची पद्धत हा एक

अनुक्रमणिका

मोठा सामाजिक अन्याय होता हे ते मनापासून मान्य करतील. ह्या अन्यायाची किंमत देऊनच अथेन्सची संस्कृती बहरली ह्या गोष्टीवर ते भर देतील. समजा, आज असा व्यावहारिक प्रश्न निर्माण झाला : तत्त्वतः गुलामगिरीसारख्या असलेल्या पद्धतीवर आधारलेली एखादी समाजरचना, त्या समाजात विज्ञान, कला, इ. सांस्कृतिक मूल्ये बहरलेली आहेत, म्हणून टिकवून धरावी का ? ही मूल्ये सुस्थितीत असलेली माणसेच साधू शकतात हे मान्य करूनही, ही गुलामगिरीसमान असलेली पद्धती जर नष्ट केली तर ही मूल्येही पूर्णपणे नष्ट होतील व म्हणून ह्या 'गुलामगिरी'च्या प्रथेची किंमत देऊनही ही मूल्ये टिकवून धरण्यासाठी ही समाजपद्धती टिकवून धरावी असा पक्ष घेता येईल. पण ह्या पक्षाला निकराने विरोध करूनही एखाद्या आधुनिक युरोपीय व्यक्तीला पेरिक्लिसचे व प्लेटोचे कौतुक करता येईल. किंवा मध्ययुगातील वास्तुशास्त्राचे किंवा स्कोलॅस्टिक तत्त्वज्ञानाचे कौतुक करता येईल आणि ही व्यक्ती पेरिक्लिसच्या काळातील गुलामाची किंवा मध्ययुगातील एखाद्या 'भूदासा'ची वंशज असेल. अशा व्यक्तींनाही युरोपियन संस्कृतीच्या इतिहासाचे 'निर्लेप' वृत्तीने रसग्रहण आणि मूल्यमापन करता येणे आज शक्य आहे.

निर्लेप वृत्तीने म्हणजे असे की जो इतिहास घडलेला आहे तो घडलेला आहे हे मान्य करणे आणि तो घडून गेलेला आहे हे ओळखणे. तो घडलेला असल्यामुळे तो पुसून टाकता येत नाही; तो जणू घडलेलाच नाही असा आव आणला तर तो खोटा ठरतो. आणि तो घडून गेलेला असल्यामुळे तो मानवी कृतीच्या पलीकडे पोचलेला असतो. अथेन्समधील गुलामांना आज आपण मुक्त करू शकत नाही. पण इतिहासाची काळी, अघोरी बाजू मान्य करूनही त्याच्यात जी मानवी संस्कृती विकसित झाली तिचे मूल्य ओळखणे आणि तो ठेवा जतन करणे हे काम उरतेच. उदा. प्लेटोने विश्वाविषयीच्या आणि माणसाविषयीच्या विवेकनिष्ठ विचाराची ( rational thought ) तार्किक घडण स्पष्ट केली. आज 'न्याय', 'समता' ह्यासारख्या तत्त्वांना अनुसरून समाजाची पुनर्रचना करण्याचे आवाहन जे करतात ते आपले आवाहन माणसाच्या विवेकशक्तीला आहे असे अनेकदा मानतात. पण अशा विवेकाधिष्ठित तत्त्वांवर आणि विवेकनिष्ठ विचारपद्धतीवर आज माणसाचा जो काबू आहे तो त्याला कसा प्राप्त झाला ह्याचा शोध जर आपण घेत गेलो तर आपण निश्चितपणे अथेन्सपर्यंत पोहोचू.

इतिहासाची काळी बाजू नाकारणे मूर्खपणाचे आहे. लोकशाहीतील गोंधळाला, बजबजपुरीला, बेशिस्तीला बिटलेल्या अनेकांना हुकूमशाही अधिक पसंत असते. पण हुकूमशाही प्रस्थापित झाली तर आपण राज्यकर्त्या पक्षातील इतरांना शिस्त लावणाऱ्यांमधील एक असू, आपले स्थान ज्याच्यावर शिस्त लादण्यात येते त्यांच्यात किंवा सर्वांना धडा शिकविण्यासाठी ज्यांना कॉन्सनट्रेशन कॅंपमध्ये डांबण्यात आलेले असते त्यांच्यात असणार नाही अशी त्यांची कशीतरी खात्री पटलेली असते. पण ही अविवेकी खात्री आहे. अनेकजण आज आपण जगतो आहोत त्याच्याऐवजी सॉक्रेटिसच्या अथेन्समध्ये किंवा उदयनकथाकोविद वृद्धांनी गजबजलेल्या अवन्तीमध्ये किंवा डॉ. जॉन्सनच्या लंडनमध्ये आपल्याला जगायला मिळाले असते तर कितीतरी बरे झाले असते असे मानतात. त्याची खात्री अशी असते की अथेन्समध्ये आपल्याला सॉक्रेटिसबरोबर गप्पा मारता आल्या असत्या, ( आपण गुलाम म्हणून जन्माला आलो नसतो, ) किंवा आपण क्षिप्रेच्या तीरी काव्यशास्त्रविनोदात कालक्रमणा केली असती, ( अंत्यज म्हणून जन्माला आलो नसतो ) किंवा डॉ. जॉन्सनबरोबर कोटीबाज, विचारपरिप्लुत संभाषणाचा आस्वाद घेतला असता ( डॉ. जॉन्सनला खुर्चीवरून वाहून आणणारा हमाल झालो नसतो ). पण संख्याशास्त्रीय दृष्टीने पाहता ह्याच्या नेमके उलट घडून येण्याचा संभव कितीतरी अधिक होता. इतिहासात जी संस्कृती फुलली तिच्यासाठी ह्या संस्कृतीपासून दूर ठेवण्यात आलेल्या असहाय माणसांनी खूपच किंमत वेचली आहे यात शंका नाही. आणि तरीही सॉक्रेटिसाच्या अथेन्समध्ये, कालिदासाच्या काव्यात आणि डॉ.

जॉन्सनच्या क्लबमध्ये मानवी चैतन्याचा उन्नत आणि उज्ज्वल आविष्कार आढळतो आणि त्याचे मूल्य सार्वत्रिक स्थलकालातीत आहे हे आपण ओळखू शकलो नाही तर स्वतःची मानवी प्रकृतीच आपण खंडित केली आहे किंवा होऊ दिली आहे असा त्याचा अर्थ होईल.

पण अथेन्समधल्या एखाद्या गुलामाचा वंशज असलेला आजचा युरोपिअन अॅथेन्सच्या संस्कृती-कडे निर्लेप वृत्तीने पाहू शकतो ह्याचे एक महत्त्वाचे कारण असे की गुलामगिरीच्या प्राचीन पद्धतीचा स्पर्श आजच्या त्याच्या व्यक्तिमत्त्वाला होऊ शकत नाही. आजच्या सुशिक्षित अस्पृश्याला–त्याची वैयक्तिक स्थिती कितीही सुखस्वास्थ्याची असली तरी– भारतीय संस्कृतीकडे पाहताना अशी निर्लेप वृत्ती धारण करणे कितीतरी अधिक कठीण आहे. त्याच्यावर आणि त्याच्या बांधवांवर ठोकलेली अस्पृश्यतेची मुद्रा अजून स्पष्ट आहे. ह्या संस्कृतीविषयीची चीड त्याच्या मनात स्वाभाविकपणे खदखदत असते. सवर्णांनी ही गोष्ट नीट ध्यानात घेतली पाहिजे. दलितांच्या दृष्टीने अस्पृश्यतेला मान्यता देणाऱ्या मनुस्मृतीसारख्या धर्मग्रंथांतच नव्हे तर रामायण आणि महाभारत यांसारख्या आर्ष महाकाव्यात, कालिदासभवभूतीच्या काव्यनाटकात, फार काय, उपनिषदांसारख्या विश्वाच्या एकात्मतेचे स्तोत्र गाणाऱ्या ग्रंथांत, ज्ञानेश्वरांच्या पसायदानातही चातुर्वर्ण्याचे महाविष कालवलेले आहे. अनेक हतभागी माणसांच्या शोषणावर आधारलेली पण मानवी चैतन्याचा उर्जस्वल आविष्कार करणारी इतिहासात जमा झालेली एक संस्कृती– जिच्या जमेची आणि खर्चाची बाजू तटस्थपणे तपासून पाहिली पाहिजे अशी एक भूतकालीन संस्कृती– म्हणून तिच्याकडे ते पाहूच शकत नाहीत. कारण तिची कमाई काय असेल ती असेल पण त्यासाठी झालेला खर्च त्यांच्याकडून अजूनही वसूल करण्यात येत आहे. म्हणून त्यांची चीड उफाळून आली आणि कडवटपणे व्यक्त झाली तर ती एक नैसर्गिक गोष्ट म्हणून स्वीकारली पाहिजे. हिंदूंचा रणांगणात पराभव करून भारतात राज्यसत्ता स्थापन करणाऱ्या, हिंदूंचे धर्मांतर घडवून आणून त्यांना मुसलमान बनविणाऱ्या मुस्लिमांचा 'जहाँमर्द' म्हणून जोतिबांनी जो गौरव केला, ब्रिटिशांच्या सत्तेचे जे स्वागत केले त्याकडे ह्या दृष्टीनेच पाहिले पाहिजे.

प्रस्थापित अन्याय्य घडी मोडून काढून तिच्याजागी अधिक न्याय्य घडी स्थापन करायची तर अन्यायाची धगधगती चीड आवश्यक असते असे असणे शक्य आहे. पण चीड आवश्यक असली तरी पुरेशी असणार नाही. ज्याची प्रेरणा प्रेमापासून लाभलेली असते आणि ज्ञान ज्याचे मार्गदर्शन करीत असते ते जीवन म्हणजे चांगले जीवन असे रसेल ह्यांनी म्हटलेले आहे. पुनर्रचना करायची तर मानवी जीवनाला आणि मानवी परिस्थितीला सामोरे गेले पाहिजे. आणि ह्यासाठी राग किंवा प्रेमही पुरेसे पडणार नाही. ज्ञान किंवा शहाणपणाही आवश्यक आहे. आणि तटस्थ, निर्लेप वृत्तीशिवाय शहाणपणा कमावता येणार नाही.

विचारवंत म्हणून जे दलित सामाजिक समतेच्या लढ्याचे नेतृत्व आज करू पहात आहेत त्यांनी ही गोष्ट ध्यानात घेणे आवश्यक आहे. एक संपन्न, प्रगल्भ मानवी संस्कृती भारतात उदयाला आली, अनेक अंगांनी बहरली आणि पुढे कुंठित झाली. तिची काळी बाजू आज अतिशय स्पष्ट झाली आहे. पण आपण सर्वच, सवर्ण आणि दलित, भारतीय मुसलमान आणि भारतीय ख्रिस्ती ह्या संस्कृतीने घडविले गेलो आहोत. ( जे सुशिक्षित आहेत ते आधुनिक पाश्चात्य संस्कृतीनेही घडविले गेले आहेत. ) आपण ह्या संस्कृतीने घडविले गेलो आहोत हा इतिहास पुसून टाकता येणार नाही; आणि ह्या समाजात रुजलेली आपली पाळेमुळे आपण खणून काढू, नवीन सुरवात करू आणि कित्येक अमूर्त तत्त्वांच्या प्रकाशात एक नवीन समाज इथे घडवू असे ज्यांचे स्वप्न आहे ते स्वप्नच रहाणार. एखादी व्यक्ती परागंदा होऊ शकते. समाजचा समाज परागंदा होऊ शकत नाही. इतिहासातले आणि भूगोलातील आपले वास्तव स्थान स्वीकारणे ही शहाणपणाची सुरुवात आहे.

व्यक्तिस्वातंत्र्य आणि व्यक्तीच्या प्रतिष्ठेवर आधारलेली समता ह्या तत्त्वांवर भारतीय समा-जाची पुनर्रचना करणे हे आजच्या भारतीयांपुढले पहिले काम आहे. ह्या तत्त्वांना विरोधी असलेली

समाजरचना आता टिकून राहू शकणार नाही हे उघड आहे. स्वार्थामुळे किंवा परंपरेच्या लळ्यामुळे ती टिकवून धरण्याचे करण्यात येणारे प्रयत्न अनैतिकच मानावे लागतील. पण ह्या तत्त्वांमुळे समाज-जीवनाची चौकट निश्चित होईल. तिचा आशय व्यक्तींच्या जीवनाच्या गुणवत्तेतच मूर्त होईल. आपल्या प्रवृत्तीनुसार आपल्या जीवनाला अर्थपूर्णता देण्यासाठी मग व्यक्तींना माणसाच्या सामाइक सांस्कृतिक वारशाकडे वळावे लागेल– विज्ञानाकडे, कला आणि साहित्य यांच्याकडे, धार्मिक वृत्तीच्या आविष्कारांकडे आणि भिन्न संस्कृतीत फुललेल्या अनेक नैतिक आणि सौंदर्यात्मक आविष्कारांकडे हा सांस्कृतिक वारसा सर्वांना उपलब्ध करून देणे हाही सामाजिक न्यायाचा महत्त्वाचा भाग आहे.

भारतीय संस्कृतीच्या वारशाच्या संदर्भात भारतीय विचारवंतांपुढे भारतीय संस्कृतीच्या वारशाच्या संदर्भात भारतीय विचारवंतापुढे दुहेरी कार्य आहे. समान मानवी प्रतिष्ठेवर आधारलेल्या न्याय्य समाजरचनेच्या विरोधी असलेले जे घटक ह्या सांस्कृतिक परंपरेत आहेत ते परखडपणे स्पष्ट केले पाहिजेत. पण त्याबरोबरच मानवी चैतन्याचा जो समृद्ध आविष्कार ह्या संस्कृतीत आढळतो त्याचाही शोध घेतला पाहिजे आणि सर्व मानवजातीसाठी म्हणून तो जतन केला पाहिजे. सवर्ण आणि दलित हिंदू आणि अहिंदू अशा सर्व भारतीय विचारवंतांनी संयुक्तपणे करावे असे हे दुहेरी कार्य आहे. निकोप बौद्धिक जीवनासाठी आणि एकात्म समाजाच्या निर्मितीसाठी विघातक आणि विधायक अशी दोन्ही अंगे असलेली ही समीक्षा एका सामाइक बौद्धिक व्यासपीठावरून होणे आवश्यक आहे.

---

**स्वामी केवलानंद सरस्वती**

यांच्या

**❀ जन्मशताब्दीनिमित्त ❀**

## नवभारतचा खास विशेषांक

विषय : **धर्म आणि समाजसुधारणा**

प्रकाशन दिन : **२५ डिसेंबर १९७८**

### निवेदन

प्राज्ञपाठशाळेचे संस्थापक ब्र. केवलानंद सरस्वती यांची जन्मशताब्दी तारखेप्रमाणे ८ डिसेंबर १९७८ ह्या दिवशी येते. स्वामीजींनी आणि प्राज्ञपाठशाळेत शिक्षण घेतलेल्या त्यांच्या शिष्यगणाने जी अनेक राष्ट्रीय सामाजिक कार्ये केली त्यांत समाजसुधारणेसाठी धर्मपरिवर्तनाचे त्यांनी केलेले आंदोलन हे अतिशय वैशिष्टयपूर्ण असे कार्य आहे. स्वामीजींच्या जन्मशताब्दीच्या प्रसंगी त्यांच्या कार्याच्या ह्या अंगाचा गौरव करण्यासाठी 'धर्म आणि समाजसुधारणा' ह्या विषयाला वाहिलेला **'नवभारता'चा विशेषांक २५ डिसेंबरला प्रकाशित होईल.** हा विशेषांक डिसेंबर १९७८ आणि जानेवारी १९७९ ह्या महिन्यांचा जोड–अंक असेल. तेव्हा १ डिसेंबरचा अंक प्रसिद्ध करण्यात येणार नाही.

'धर्म आणि समाजसुधारणा' ह्या विषयाच्या विविध पैलूंवर नामांकित विचारवंतांनी लिहिलेल्या लेखांचा संग्रह म्हणून प्रसिद्ध होणारा हा विशेषांक वाचकांना संग्राह्य वाटेल असा विश्वास आहे.

का. संपादक

सौ. कमलाबाई टिळक

# सोफोक्लीजची चार शोकनाट्ये : प्रस्तावना

[ सोफोक्लीजच्या ' किंग ईडिपस,' ' ईडिपस अॅट कॉलोनस, ' ' अॅन्टिगनी ' व ' इलेक्ट्रा ' या चार शोकनाट्यांचा मराठी अनुवाद महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळातर्फे लौकरच प्रसिद्ध होत आहे. ' नवभारत ' च्या मार्च, १९७८ च्या अंकात युरायपिडीजच्या शोकनाट्यांची प्रस्तावना छापली होती. त्यात प्रथम ग्रीक शोकनाट्याच्या सिद्धांतांविषयीचे सर्वसाधारण विवेचन समाविष्ट होते. या प्रस्तावनेतही प्रथम ते विवेचन, नाटकांचा संग्रह प्रसिद्ध होईल तेव्हा घालावयाचे आहे. पण ' नवभारत ' च्या वाचकांनी हे विवेचन पूर्वीच वाचलेले असल्यामुळे येथे त्याची द्विरुक्ती टाळली आहे व एकदम सोफोक्लीजसंबंधीच्या मजकुरापासूनच सुरुवात केली आहे. ही प्रस्तावना मंडळाच्या अनुमतीने ' नवभारत ' मध्ये दिली जात आहे. ——का० सं० ]

---

ग्रीक शोकात्मिकांच्या नाटककारांत सोफोक्लीज याला मानाचे स्थान प्राप्त झाले आहे. त्याला इतकी कीर्ती लाभली आहे की, ' शोकनाट्याचा तो होमर ( ग्रीक महाकवी ) होता ' असे म्हणण्यात येई व होमरलाही नंतर ' महाकाव्याचा सोफोक्लीज ' असे म्हणत.

अथेन्सजवळ कोलोनसमध्ये सोफोक्लीजचा जन्म इ. स. पू. ४९७ मध्ये झाला. त्याचा पिता प्रसिद्ध कारागीर होता. संपन्न सुखवस्तू घराण्यात व्हावे असे सुसंस्कार सोफोक्लीजवर झाले होते व त्याला योग्य ते शिक्षणही मिळाले होते. अथेन्समध्ये प्रतिवर्षी होणाऱ्या कुस्त्यांच्या फडात त्याने पारितोषिके मिळविली होती. तो वाद्येही उत्तम वाजवी. इ. स. पू. ४८० मध्ये ग्रीक नौदलाने पर्शियनांविरुद्ध सॅलॅमी येथील युद्धात मिळविलेल्या विजयाबद्दल अथेन्समध्ये जो उत्सव साजरा करण्यात आला त्यात गायक व वाद्यवृंदात वीणा वाजवण्याचे व गाण्याचे काम सोफोक्लीजने केले होते. इ. स. पू. चौथ्या शतकात अथेन्सच्या नाट्यगृहात सोफोक्लीजचा पूर्णाकृती ब्राँझचा पुतळा बसवण्यात आला. त्यात सोफोक्लीज वीणावादन करीत आहे असेच दाखवले आहे.

सोफोक्लीजच्या गुणविशेषांची कदर करून त्याला अनेक अधिकारपदे अथेन्स नगरराज्यात देण्यात आली. पण त्याला राजकारणापेक्षा साहित्यात विशेष रस होता. तो सत्तावीस–अठ्ठावीस वर्षांचा असतानाच, अथेन्समध्ये प्रतिवर्षी होणाऱ्या डिओनायससच्या उत्सवात स्पर्धेसाठी नाटके सादर करू लागला व त्याने एकंदर चोवीस वेळा स्पर्धेत पारितोषिके मिळविली. एकदा तर त्याने शोकनाट्यसम्राट इस्किलस याचा स्पर्धेत पराभव केला. असे म्हणतात, की ही गोष्ट इस्किलसच्या मनाला इतकी लागली की तो इ. स. पू. ४६८ मध्ये अथेन्स सोडून गेला.

सोफोक्लीज हा धर्मनिष्ठ व शुद्ध आचरणाचा असून त्याचा स्वभाव निरहंकारी व ममताळू होता. त्यामुळे तो फार लोकप्रिय झाला होता. आपल्याहून लहान नाटककारांशी तो फार सौजन्याने वागे. ग्रीक नाटककार युरायपिडीज याच्या मृत्यूची वार्ता ( इ. स. पू. ४०६ ) अथेन्समध्ये आली तेव्हा सोफोक्लीजने शोकवस्त्रे परिधान केली व नटांना उघडया माथ्यांनी रंगमंचावर येण्यास आज्ञापिले. अथेन्समधील साहित्यिक वर्तुळाचा तो प्रमुख होता. श्रेष्ठ मुत्सद्दी पेरिक्लिज व आद्य इतिहासकार हेरोडोटस हे त्याचे परमस्नेही होते. " कोलोनसमध्ये ईडिपस " या शोकनाट्यात त्याने इजिप्त देशातील चालीरीतींचा उल्लेख केला आहे तो हेरोडोटसच्या ग्रंथातून घेतला आहे.





अनुक्रमणिका

सोफोक्लीजचे अथेन्सवर व अथेन्सच्या लोकांवर फार प्रेम होते. इतर ग्रीक नाटककार, आसपासच्या ग्रीक नगरराज्यांच्या आमंत्रणावरून त्या राज्यात जाऊन रहात, पण सोफोक्लीज मात्र अथेन्स सोडून कधीही, कुठल्याही विलोभनाला बळी पडून, गेला नाही. त्याने अथेन्सचा वैभवकाळ पाहिला तसा त्याचा पडता काळही पाहिला, कलाक्षेत्रात त्याने देशाची सेवा केली व त्याला जन्मभर सर्वांचे प्रेम व आदर लाभला. त्याचे जीवन सुखात गेले व 'अनायासाने मरण' आले. ९१ वर्षांचा होऊन, अतिवार्धक्याने शक्ती क्षीण होऊन तो मरण पावला. अथेन्सच्या लोकांनी एक 'महामानव' म्हणून त्याला मृत्यूनंतर मानवंदना दिली. त्याचे दफन त्याच्या पूर्वजांच्या समाधिस्थानी करावयाचे होते. हे ठिकाण अथेन्सच्या बाहेर दीडदोन मैलांवर होते. त्या वेळी अथेन्सभोवती स्पार्टनांचा वेढा पडला होता. पण सोफोक्लीजच्या नावाभोवतीचे कीर्तिवलय जाणून स्पार्टनांनी त्याचा देह अथेन्सच्या लोकांना वेढ्यामधून सुरक्षितपणे बाहेर नेऊ दिला.

ॲरिस्टॉफॅनीज् (इ. स. पू. ४४४ ते इ. स. पू. ३८०) या ग्रीक हास्यरसात्मक नाटके लिहिणाऱ्या प्रथितयश नाटककाराने आपल्या 'बेडूक' (Frogs) या उपरोधगर्भ हास्यरसात्मिकेत हेडीज् (अधोलोक) मधल्या इस्किलस, युरायपिडीज व सोफोक्लीज या श्रेष्ठ नाटककारांच्या वास्तव्याचे वर्णन केले आहे. प्रत्येक कलाक्षेत्रातील सर्वश्रेष्ठ मृतात्म्याला भोजनाच्या मेजावर हेडीजचा स्वामी प्लुटो याच्या उजव्या बाजूला मानाचे स्थान मिळत असे. शोकनाट्यसम्राट इस्किलस याला ते स्थान प्राप्त झाले होते. पण युरायपिडीज याचे आगमन मृत्यूनंतर हेडीजमध्ये झाल्याबरोबर त्याने आपल्या बंडखोर स्वभावाप्रमाणे, इस्किलसचे स्थान आपल्याला मिळावे अशी मागणी केली. सोफोक्लीज मात्र हेडीज्मध्ये आल्यावर, इस्किलसला नम्रपणे वंदन करून, इतरत्र बसला. पुढे इस्किलस व युरायपिडीज् यांच्या नाटकांतील नाट्यगुणांचे मूल्यमापन करण्यासाठी डिओनायससला पंच नेमले. निर्णय होण्यापूर्वीच, इस्किलसला अथीनिअन लोकांना लढण्याची स्फूर्ती देण्यासाठी पृथ्वीवर बोलवून घेण्यात आले. जाताना इस्किलसने "माझी मानाची जागा सोफोक्लीजला द्या. त्याला मी माझ्यानंतरचा श्रेष्ठ शोकनाट्यकार समजतो" असे सांगितले.

सोफोक्लीजनंतर त्याचे मुलगे व नातूही चांगली नाटके लिहू लागले. त्याच्या घराण्यातच नाट्यलेखनाची कला होती. त्याचा नातू, सोफोक्लीज (आजोबाचेच नाव ठेवलेला) यावर सोफोक्लीजची विशेष माया होती; तेव्हा सोफोक्लीजचा मुलगा आयोफोन याने, बाप आपली मालमत्ता छोट्या सोफोक्लीजला देऊन टाकील या भीतीने, न्यायालयात दावा केला की म्हातारपणामुळे आपल्या बापाला बुद्धिभ्रंश झाला आहे तेव्हा त्याच्या हातून मालमत्तेची व्यवस्था काढून घ्यावी. त्या वेळी आपल्या बचावासाठी सोफोक्लीजने, त्या वेळी तो लिहीत असलेल्या "कोलोनसमध्ये इडिपस" या नाटकातल्या कोलोनसभूमीच्या गौरवात्मक गीतातल्या काही ओळी वाचून दाखविल्या. त्या गीतातील काव्यसौंदर्याने भारावून न्यायाधीशाने उद्‌गार काढले की, "इतके प्रतिभापूर्ण, सुंदर काव्य रचणाऱ्याच्या बुद्धीला भ्रंश झाला आहे असे विधान करण्याचे धाडस कुणीही करू शकणार नाही."

सोफोक्लीजने शंभरांपेक्षा जास्त नाटके लिहिली होती, असे मानतात. पण त्यांतली फक्त सातच उपलब्ध आहेत. व त्यांनी आपल्या गुणवत्तेने सोफोक्लीजला जागतिक, अक्षय कीर्ती मिळवून दिली आहे. अठराव्या–एकोणिसाव्या शतकांत सोफोक्लीजच्या नाटकांच्या अभ्यासाला वेग आला व तद्विषयक संशोधनात त्याने लिहिलेली काही किन्नर–नाट्ये (satyr plays) व त्याच्या इतर नाटकांचे काही सुटे भाग भूर्जपत्रांवर लिहिलेले सापडले आहेत. सोफोक्लीजची सर्व उपलब्ध नाटके त्याच्या वयाच्या चाळीशीनंतर लिहिलेली आहेत.

सोफोक्लीज नाटके लिहू लागला तेव्हा ग्रीक रंगभूमीवर इस्किलसचा संपूर्ण प्रभाव होता. सोफोक्लीजवरही त्याचा परिणाम झाला असला पाहिजे. इस्किलसने पुरातन काळापासून चालत आलेल्या Tragodia ला शोकनाट्याचे स्वरूप दिले. दुसरे पात्र नाटकात घालून त्याने कथनाला संवादाचे रूप दिले व नाट्याचा ओनामा घालून दिला. इस्किलसच्या भव्य, उदात्त प्रतिभेने व त्याच्या घणाघाती भाषाशैलीने ग्रीक रंगमंच झळाळून उठला होता. सोफोक्ली-

अनुक्रमणिका

जने शोकनाटचाला प्रगतिपथावर आणखी पुढे नेऊन त्याला जागतिक साहित्यात अमर केले. रंगमंचावर तिसऱ्या पात्राचा प्रवेश, कथानकाचा नेटका आकृतिबंध, सूक्ष्म स्वभावरेखन, सखोल तत्त्वचिंतन व साधी पण आशयाचा समर्पक व समर्थ वेध घेणारी भाषाशैली या त्याने ग्रीक रंगभूमीला दिलेल्या देणग्या आहेत. त्याने ग्रीक रंगभूमीत नवीन चैतन्य ओतले व तिला निश्चित व सुबक आकार दिला. नाटचतंत्र व नाटचगुण यांना त्याच्या लेखणीच्या जादूने नवीनच आकर्षक, ठाशीव, व्यापक व सुसंस्कारित स्वरूप आले.

ॲरिस्टॉटलने आपल्या काव्यशास्त्रात शोकनाटचात आवश्यक अशी जी अंगे वर्णिली आहेत, ती सोफोक्लीजमध्ये कशी प्रगट झाली होती ती पाहू.

ॲरिस्टॉटलच्या मते कथानक हे शोकनाटचात सर्वांत महत्त्वाचे अंग. सोफोक्लीजच्या नाटकांत कथानक-रचनेचे चातुर्य पूर्णांशाने प्रगट होते. आपली कथानके, इतर ग्रीक नाटककारांप्रमाणेच तो जुन्या ग्रीक महाकाव्यांतून व नगरराज्यांच्या राजघराण्यांच्या इतिहासातून घेई. पण कथानकातील नाटचबीजे तो नेमकी पकडी व त्यांना आपल्या नाटकांतून फुलवीत नेई. उदाहरणार्थ, राजा ईडिपसचा कोलोनसमधील मृत्यू. मूळ लोकथेत ही काही मोठीशी नाटचपूर्ण घटना नव्हती. पण सोफोक्लीजने त्या घटनेवर आपल्या प्रतिभाविलासाने, कल्पनाचातुर्याने, व समर्थ कलागुणांनी मोठे भव्य, दिव्य शिल्प उभारले.

सोफोक्लीज आपली कथानके पायरीपायरीने विकसित करीत, वाचकांची उत्कंठा ताणीत ती रसोत्कर्षाच्या परमोच्च बिंदूपर्यंत पोचवी. ॲरिस्टॉटलच्या मते भाग्याची उलथापालथ व सत्यस्थितीची एकदम होणारी प्रखर, दाहक जाणीव ( reversal and recognition ) ही शोकनाटचाच्या कथानकाचा जणू आत्माच. सोफोक्लीज या दोन्ही गोष्टींचा आपल्या नाटकाच्या अखेरीस इतका उत्कट परिणाम करी की वाचक प्रेक्षकांच्या अंगावर रोमांच उभे रहात. शोकनाटचाचे उद्दिष्ट, करुणा व भयचकितता ( pity and terror ) यांचा प्रक्षोभ करणे हे या उत्कट अखेरीत उत्कृष्ट रीत्या साधते. ‘ राजा ईडिपस ’ हे नाटक सोफोक्लीजच्या कथानक-रचना-कौशल्याचे उत्कृष्ट उदाहरण आहे. नाटकाच्या प्रारंभी राजा ईडिपसभोवती सत्ताधीशत्वाचे, प्रचंड आत्मविश्वासाचे तेजोवलय आहे. पण भाग्यचक्र फिरल्यावर आपल्या हातून घडलेल्या पापाच्या जाणिवेने तडफडणारा, उद्वेगाने आपले डोळे फोडून घेणारा, वैभवाच्या दर्पात नगरीवरील अरिष्टांना कारणीभूत असलेल्या कलंकी पाप्याला भीषण दंड करण्याबद्दलची केलेली घोषणा स्वतः त्याच्यावरच उलटून निर्वासित होण्याचे नशिबी आलेल्या ईडिपसला पाहून वाचकाचे मन कातरविस्मयाने व्याकूळ होते व अपार करुणेने भारावून जाते.

याप्रमाणे नाटचपूर्ण घटना, पात्रांचे सूक्ष्म व सखोल स्वभावरेखाटन व व्याजोक्ती गर्भसंवाद यांमुळे सोफोक्लीजची कथानके वेगवान, प्रत्ययकारी व रंजक होतात. शिवाय ॲरिस्टॉटलने विहित केलेली, स्थळ, काळ, घटिते यांची एकसूत्रताही सोफोक्लीज कथानकात साधतो. अंतिम लक्ष्याचे अवधान एकतानतेने राखणाऱ्या शर्यतीतील घोडचाप्रमाणे सोफोक्लीजचे कथानक डौलदार, चपळ गतीने, आखलेल्या मार्गापासून किंचितही न ढळता, प्रेक्षकांची उत्कंठा क्षणोक्षणी वाढवीत, रसोत्कर्षाची अखेरी गाठते.

या कथानकाच्या घोडदौडीच्या यशात, पात्रांच्या स्वभावरेखनातील कौशल्याचाही वाटा असल्याचे सोफोक्लीजच्या नाटकांत स्पष्ट दिसते. शिवाय ॲरिस्टॉटलप्रमाणे सोफोक्लीजच्या मते शोकनाटचात कथानक हे प्रमुख अंग नसून, पात्रांचे स्वभावविशेष हे अधिक महत्त्वाचे आहेत. शोकनाटचातील घटना या नियतीने निश्चित केलेल्या असल्या, तरी त्या प्रत्यक्ष सत्यसृष्टीत उतरवायला पात्रांचे स्वभावविशेषच, सोफोक्लीजच्या नाटकांत कारणीभूत होतात. मध्यवर्ती पात्र भोवतालच्या पात्रांशी, निरनिराळ्या प्रसंगी, जसजसे आपल्या विशिष्ट स्वभावानुरूप वागते, तसतशा त्या वर्तनाला अनुसरून निरनिराळ्या घटना पुढे सरकत रहातात व नाटकाच्या शेवटी त्यातून आकारास आलेली अखेरी गाठतात. सोफोक्लीजने तिसरे पात्र नाटकात आणल्यामुळे हे कथानकाच्या विकासाचे कार्य जास्त सुलभ झाले. तीन पात्रांच्या परस्पर प्रतिक्रियांतून – संवादांतून कृतींतून कथानक नाटचपूर्ण रीतीने फुलत जाते. उदा-

अनुक्रमणिका

हरणार्थ, 'राजा ईडिपस' मध्ये ईडिपसचे क्रेओनची संशयग्रस्त वर्तन, मेंढपाळांशी संभाषण व जन्मरहस्याच्या अतिसखोल चौकशीला जोकास्टा करीत असलेला विरोध न जुमानण्याचा हट्ट वगैरेंतून एकाच वेळी ईडिपसचा उतावळा, मनस्वी आग्रही स्वभाव स्पष्ट होत जातो व या त्याच्या स्वभाववैशिष्ट्यामुळे नियतीने त्याच्यासाठी योजलेली अखेर झपाट्याने, अटळपणे जवळ जवळ येत जाते. इस्किलसच्या नाटकात अपरिहार्य नियतीची छाया प्रारंभापासून शेवटपर्यंन्त सारा रंगमंच झाकळून टाकते; पण सोफोक्लीजच्या नाटकांत, शोकनाट्याचा नायक नियतीला आपले संकेत पार पाडण्यास आपल्या स्वभाववैशिष्ट्याने व तदनुरूप कृतीने, जणू साहाय्यच करतो.

अर्थात ॲरिस्टॉटलनेही म्हटलेच आहे की, "शोकनाट्याचा नायक एकदम पूर्ण पुरुष नसावा. त्याच्या स्वभावातील काही त्रुटींमुळे किंवा त्याच्या एखाद्या प्रमादाने – मग तो नकळतही घडलेला असेना– त्याच्यावर अरिष्ट कोसळते, असे दाखवावे" सोफोक्लीजने आपले नायक असेच रंगवलेले आहेत. राजा ईडिपसचा आततायी, जिद्दी, फाजील आत्मविश्वासयुक्त स्वभाव त्याच्या अंतिम विनाशाला कारण होतो. पण त्याच्या अंगच्या इतर श्रेष्ठ गुणांमुळे तो धीरोदात्त व असामान्य असल्याचे मनात ठसते. सामान्य माणसाच्या विनाशाने वाचकांचे चित्र कातर, विस्मित किंवा दयार्द्र होणार नाही.

सोफोक्लीजच्या मध्यवर्ती पात्रांखेरीज त्याची साहाय्यक, गौण पात्रेही उठावदार होतात. त्यांच्या स्वभावांतले सूक्ष्म बारकावे, ते कथानकाला पुष्टी देतील, मुख्य पात्राच्या स्वभाववैशिष्ट्यांवर प्रकाशाचा झोत टाकतील अशा रीतीने सोफोक्लीज रेखाटतो व त्यामुळे ही दुय्यम पात्रेही वाचकांच्या मनावर खोल ठसा उमटवून जातात.

याप्रमाणे सोफोक्लीजची सर्वच पात्रे वास्तव, जिवंत वाटतात; परंपरेने आकृतिबंध ठरून गेलेली किंवा नियतीच्या सूत्रावर नाचणारी, निर्जीव बाहुली वाटत नाहीत. राजा ईडिपस, इलेक्ट्रा, ॲन्टिगनी ही सर्व स्वतःच्या प्रेरणेप्रमाणे वागत असल्यामुळे ती उत्कट भावनावेगाने रसरसलेली असतात. ॲरिस्टॉटलने म्हटले आहे की 'सोफोक्लीज पात्रे रंगवतो ती त्याला जशी असावीशी वाटतात तशी; युरायपिडीज ती जशी आहेत तशी'. याचा अर्थ हाच की, सोफोक्लीज कल्पनाशक्ती वापरून आपल्या पात्रांना निरनिराळ्या नाट्यमय व संघर्षात्मक प्रसंगांतून नेतो व त्या वेळी ती कशी वागतील, हे आपल्या मनुष्यस्वभावाच्या अचूक व सखोल ज्ञानाने ओळखून तसतशी कृती त्यांच्याकडून करवतो. हे सर्व प्रसंग त्याच्या आशयगर्भ, प्रभावी शैलीने प्रत्ययकारी होतात व त्याच्या पात्रांचे वास्तवदर्शन वाचकांना अनेक पैलूंतून होते.

सोफोक्लीजने तिसरे पात्र रंगभूमीवर आणले ही गोष्ट प्रथमदृष्ट्या किरकोळ वाटेल. पण ती कथानकाचा विकास, व्यक्तिदर्शन व संवादांतील नाट्यगुण या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची आहे हे त्याच्या नाटकांवरून उघड दिसते. नाटकांत दोनच पात्रे होती; तेव्हा कथानकाच्या विकासाचे दर्शन गायकवृंदाच्या कथनाद्वारे घडवावे लागे. आता तीन पात्रांच्या परस्पर प्रतिक्रियांद्वारा कथानक प्रगत होत असलेले प्रत्यक्ष रंगभूमीवर दाखवता येऊ लागले. प्रत्येक व्यक्तीच्या स्वभावातील भिन्न भिन्न पैलू तीन पात्रांच्या परस्परसन्मुखतेमुळे कसे उजळून उठतात हे "राजा ईडिपसच्या" उदाहरणावरून पूर्वी पाहिलेच. तीन पात्रांच्या परस्परसंवादामुळे नाट्यगुणांची अभिवृद्धी होते, तसेच कथानकालाही एक तिसरे परिमाण प्राप्त होते. दोन पात्रे परस्परांशी बोलतांना भावी कृतीची एक दिशा ठरवतात. पण तिसरे पात्र असले म्हणजे त्या कृतीला आणखी एक फाटा फुटतो व कथानकात विविधता, वैचित्र्य येते. तीन पात्रे असल्यामुळे विविध भावनांचाही रसोत्कर्ष होतो. 'इलेक्ट्रा'त शिक्षक ॲरिस्टीजच्या मृत्यूची बातमी सांगत असता, क्लायटेम्नेस्ट्रा बाहेरून दुःखाचे ढोंग करीत असली, तरी तिला आतून आनंदाच्या उकळ्या फुटत असतात; उलटया बातमीने इलेक्ट्रा शोकाकुल होऊन जाते. सत्य परिस्थिती वाचकांना माहीत असल्यामुळे तर या व्याजपूर्ण प्रसंगाने उत्पन्न होणाऱ्या नाट्याने वाचक मोहित होतो. शिवाय संघर्ष हा नाट्याचा आत्मा असतो. हा संघर्ष दोन पात्रांऐवजी तीन पात्रे योजल्यामुळे तिरंगी होतो व नाट्यगुणांचा प्रकर्ष होतो.

अनुक्रमणिका

सोफोक्लिजचा गायकवृंद (chorus) त्याच्या पूर्वी होऊन गेलेल्या ग्रीक नाटककारांच्या गायकवृंदापेक्षा आपल्या अनेक वैशिष्ट्यांनी निराळयाच प्रकारे उठून दिसतो. सोफोक्लीजने वृंदाचे निव्वळ कथनाचे काम, तीन पात्रे घालून, कमी केले आहे, हे आपण पाहिलेच. शिवाय सोफोक्लीजचा गायकवृंद हा अॅरिस्टॉटलच्या सिद्धांताप्रमाणे नाटकातले एक पात्रच बनून जातो. तो पात्रांशी व घटनांशी समरस होतो. सोफोक्लीजच्या नाटकातील गायकवृंद आदर्श आहेत असे अॅरिस्टॉटलने निरनिराळी उदाहरणे देऊन स्पष्ट केले आहे. 'राजा ईडिपस'मधल्या थीब्सच्या नागरिकांचा गायकवृंद थीब्स शहराबद्दल व आपल्या राजाबद्दल, व 'अँटीगनी' मधला वृंद अँटिगनीबद्दल अत्यंत जिव्हाळा दाखवतो. 'कोलोनसमध्ये ईडिपस' मधला कोलोनसवासीयांचा वृंद व 'इलेक्ट्रा' मधला आर्गॉस व मायसिनीनिवासीय नारीवृंद हे तर कथानकातल्या एखाद्या पात्राप्रमाणेच वावरताना व बोलताना दिसतात.

सोफोक्लीजचा गायकवृंद हा प्रेक्षक व पात्रे यांच्यामधला एक प्रकारे दुवाच असतो. प्रेक्षक गायकवृंदाशी समरस होऊन, त्याच्याबरोबर ईडिपससाठी हळहळतात; वृद्ध, अंध ईडिपसचे कोलोनसमधील भव्य, दिव्य निर्वाण पाहून स्तिमित होतात; इलेक्ट्राच्या भावनावेगात भागीदार होतात.

पण, भूतकालीन व वर्तमान घटनांवर मतप्रदर्शन करणारा, कधी एका पक्षाची तर 'अँटिगनी' मधल्याप्रमाणे कधी दुसरी बाजू घेणारा, नाना घटनांवरील प्रतिक्रियांत पात्रांशी व प्रेक्षकांशी एकात्मता पावून उत्कंठा, आशा, भीती वगैरे भावना, प्रगट करणारा हा वृंद आपल्या गीतांमध्ये (odes) मात्र एका आगळयाच काव्यमय, तत्त्वचिंतनात्मक द्रष्ट्याच्या भूमिकेत प्रवेश करतो. शोकनाट्यातील प्रमुख रसांची– कारुण्य व कातरता– निष्पत्ती करण्याचे कार्य ही गंभीर गीते करतात. ही गीते, एखादा अपवाद सोडल्यास, नाटकातील घटनांच्या संदर्भात असतात. कल्पनारम्यता, भावसौंदर्य व सुभग शैली यांचा मधुर संगम या गीतांत सोफोक्लीज साधतो, त्याचप्रमाणे त्याच्या जीवनविषयक सखोल तत्त्वचिंतनाचाही त्यात समावेश असतो.

आपल्या नाटकांतून निरनिराळ्या घटना नाट्यपूर्ण रीतीने मांडीत असताना, सोफोक्लीज या घटनांच्या मुळाशी व अंतिम परिणामांशी संलग्न असलेल्या जीवनातील शाश्वत मूल्यांचा शोध घेत राहतो. मानवाच्या वाटयाला नाना दुःखे येतात याचे कारण निव्वळ योगायोग किंवा देवदेवतांचा रोष, हे नव्हे. सोफोक्लीजच्या मते विश्वाच्या या सारख्या फिरत रहाणाऱ्या चक्राच्या गतीत एक प्रकारचा समतोल आहे. निसर्ग व मानव या दोघांच्या जीवनात एक प्रकारचा समतोलपणा नेहमी राखला जातो. त्यांच्या कार्यवाहीत एक प्रकारची लयबद्धता आहे, एक पद्धत आहे, काही तत्त्व आहे, काही कार्यकारणभाव आहे. मानवाच्या हातून जेव्हा एखादा प्रमाद (Hamartia) होतो तेव्हा हा समतोल बिघडतो व त्याचा दंड त्याला भोगावा लागतो. सोफोक्लीजच्या ग्रीक प्रेक्षकवृंदाला ही शिस्तबद्धतेची, समतोलाची कल्पना रुचण्याजोगीच होती, कारण No Excess – 'अतिरेक नको'– हा त्यांच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानाचा मध्यबिंदूच होता.

पण राजा ईडिपस याच्या हातून अजाणतेपणी प्रमाद घडलेला असताना त्याला कठोर शिक्षा का होते? बंधुप्रेमाच्या पोटी आपले कर्तव्य करीत असताना अँटिगनीला मृत्यूला कां तोंड द्यावे लागते? असे प्रश्न वाचकांच्या पुढे साहजिकच उभे रहातात. या प्रश्नांना सोफोक्लीजचे उत्तर असे आहे की, मानवी जीवन हे फार व्यापक व गुंतागुंतीचे आहे. मानवाच्या तोकड्या बुद्धीला जीवनातील फक्त अर्ध्या भागाचेच दर्शन व आकलन होते व ते त्याला अनिश्चित व अन्यायी असल्याचे भासते. पण सर्व साक्षी झ्यूसला जीवनाचे संपूर्ण चित्र ज्ञात असते व त्यामुळे प्रारंभी अजाणतेपणी केलेल्या पापाला दंड झाला असला — व तो होतोच, कारण 'पाप केलें की दंड झालाच पाहिजे' हा विश्वरहाटीचा, जातिमूल्यनिरपेक्ष असा दंडक आहे– तरी अखेरीस त्या व्यक्तीला सर्वेशाकडून न्याय मिळतो. हा न्याय कधी मानवांकरवी होतो – इलेक्ट्रामध्ये तो ऑरेस्टीजच्या हातून होतो– पण मानवांच्या हातून तो न झाला, तर स्वर्गस्थ शक्ती किंवा निसर्ग ते काम करतात. कधी कधी तर अन्यायाचा बळी झालेलें मृत अखे-

अनुक्रमणिका

डीस अपराध्यांचा सूड घेतात. इलेक्ट्रा म्हणते, 'अनेक वर्षांपूर्वी मृत झालेले, आपल्या मारेकऱ्यांचे रक्त शोषण करतील.' अँटिगनीत टायरेसिअस म्हणतो, "अंत्यसंस्कार न झालेल्या पॉलीनायसिसच्या मृत देहाचे मांस गिधाडे, कुत्री खातील; मग ती नगरीतील वेदी भ्रष्ट करतील, व मग सारी नगरी क्रुद्ध होऊन राजाविरुद्ध – अपराध्याविरुद्ध – बंड करून उठेल." "राजा ईडिपसच्या" आरंभीही नगरीत रोगराई वगैरे अरिष्टे उद्‌भवल्याचे वर्णन आहे. 'कोलोनसमध्ये ईपिडस' मध्ये सोफोक्लीजने राजावरचा कलंक धुऊन निघून तो नगरीचा भूषण बनल्याचे व दिव्यत्व पावल्याचे दाखविले आहे. अँटिगनीलाही मृत्यूनंतर क्रेओनने तिच्या भावाचा यथायोग्य अंत्यसंस्कार केला म्हणून, समाधान लाभले असेल.

ही विश्वरहाटी ध्यानात घेऊन मानवाने सावध रहावे असा सोफोक्लीजचा सल्ला आहे. मानवाला होणारे जीवनदर्शन इतके व्यापक, गुंतागुंतीचे व अनिश्चित असते, की मानवाने त्याच्या दिशेला कलाटणी देण्याचा प्रयत्न करणे म्हणजे स्वतःची फसवणूक करून घेणे आहे. राजा ईडिपस पितृत्वाचे संभाव्य पाप टाळण्यासाठी कॉरिंथ सोडून गेला तो नेमका थीब्सजवळ त्याच पापाच्या जाळ्यात सापडला. मानवी विवेचक बुद्धी तोंकडी आहे. तिच्यावर फाजील भर देणे, तिच्याबद्दल फाजील अहंकार बाळगणे म्हणजे अरिष्टास आमंत्रण देणे आहे. मानवाच्या जीवनाची शोकांतिका होण्याचे कारण मानव आपल्या मर्यादा न ओळखता, अटळ नियतीशी झुंज घ्यायला निघतो हे होय, असे सोफोक्लीज आपल्या नाटकांतून दाखवतो.

मात्र याचा अर्थ, सोफोक्लीज मानवाला तुच्छ लेखतो, असा मुळीच नाही. मानवाची प्रतिष्ठा तो जाणतो. 'कोलोनसमध्ये ईडिपस' या नाटकात मानव ईडिपसप्रमाणे शरीराने दुबळा असला, तरी त्याची आध्यात्मिक उंची रविपुष्पे खुडण्याइतकी गगनभेदी आहे असे सोफोक्लीजने दाखविले आहे. कारण शोकांतिका होते ती थोर पुरुषांच्या जीवनाचीच. माणूस जितका प्रखर बुद्धीचा, कर्तृत्ववान, असामान्य तितका त्याच्या विनाशाचा वेग प्रचंड. सामान्य माणसाच्या जीवनात दिव्यान्त शोकनाट्य अवतरूच शकत नाही. सामान्य माणसाच्या मृत्यूच्या वेळी काही तारे निखळत नाहीत, अस्मानी उत्पात होत नाहीत. असामान्य मानवच, फीनिक्स पक्ष्यासारखे विनाशाच्या रक्षेतून पुनर्जीवन घेऊन उठतात, दिव्यत्व पावतात. "कोलोनसमध्ये ईडिपस" या नाटकात सोफोक्लीजने हे पुनरुत्थान स्पष्ट केले; पण इतर नाटकांतही ते गर्भित असते, वाचकांच्या कल्पनाशक्तीवर सोपविलेले असते. अथेल्लो, हॅम्लेट - हे शेक्सपिअरचे शोकनाट्यनायकही आपल्या स्मृतीत रहातात ते थोर, उदात्त, असामान्य व्यक्ती म्हणूनच.

परिणामी सोफोक्लीजच्या नाटकांचा अंतिम परिणाम मानवाच्या अगतिकत्वामुळे उत्पन्न होणारे नैराश्य हा नसून, मानवाच्या थोरवीची जाणीव हाच असतो. असामान्याच्या वाट्यास आलेला कर्मभोग पाहून कारुण्याने मन भारावते; पण त्यांच्या अंगची धीरोदात्तता पाहून मन विस्मित होते. आरंभीच्या निराशेचे पटल दूर होऊन करुणा व कातरता या अतिरिक्त भावनांचे विरेचन होते व मनाला एक प्रकारचा आल्हाद वाटू लागतो. वाचकाला शोकांतिका वाचून आनंद का वाटतो (Tragic pleasure) याचीही मीमांसा अशा प्रकारे करता येईल.

सोफोक्लीजला मानवाची ही थोरवी अभिप्रेत असल्यामुळे की काय, त्याच्या नाटकांत, इतर ग्रीक नाटकांप्रमाणे अतिमानवी शक्तींना (Supernatural) प्राधान्य नसते. इतर नाटकांप्रमाणे त्याच्या नाटकात ग्रीक देव रंगभूमीवर वावरत नाहीत. अतिमानुषत्वाचा उपयोग क्वचित् तो वातावरण–निर्मितीसाठी करतो, उदा.– 'कोलोनसमध्ये ईडिपस– पण ही अद्‌भुतता नेहमी अदृश्य, पडद्याआड असते. देव योजतात; पण त्या योजना सत्यसृष्टीत उतरवतात मानवच. ते देवांच्या बरोबरीने आपल्या कर्तृत्वाचा ठसा उमटवीत रहातात. मानवाचा पुत्र जगतात अगदीच पराधीन नाही असे सोफोक्लीज सतत स्पष्टपणे दर्शवितो.

देवांचे आगमन रंगमंचावर घडवून इतर ग्रीक नाटककार जो अद्‌भुत, रोमांचकारक अनुभव देतात, तो सोफोक्लीज इतर नाट्यपूर्ण करामतीने साधतो. रक्ताळलेल्या डोळ्यांचा ईडिपस रंग-

भूमीवर पाहून प्रेक्षक भयचकित होतो. कधी कधी तर निःशब्द स्तब्धतेचा उपयोग सोफोक्लीज अशा प्रकारे करतो, की प्रेक्षकांच्या अंगावर काटा उभा रहातो. अँटिगनीमध्ये युरिडायसी मुलाच्या मृत्यूची वार्ता ऐकतांच एकही शब्द न बोलता रंगमंचावरून निघून जाते, तसेच 'राजा ईडिपस' मध्ये ईडिपसच्या जन्मरहस्याचा गौप्यस्फोट होणार असे दिसताच जोकास्टा निःशब्दपणे आत जाते– तेव्हा गायकवृंदाप्रमाणेच वाचक व्याकूळ होऊन मनात म्हणतो, 'काय करतील आता ह्या ?'

सोफोक्लीजची भाषाशैली अनलंकृत पण सुभग, प्रसन्न पण आशयगर्भ व सूचक असल्यामुळे अत्यंत परिणामकारक अशी आहे. त्याची मुक्तछंदबद्ध पद्यरचना ओघवती आहे. ती बाहेरून साधी वाटली तरी त्यात युक्तीने अंतर्भूत केलेली, लक्षात न येणारी कला पूर्णांशाने आहे. अर्थात, त्याच्या भाषेतली नादमधुरता, लयबद्धता, ग्रीक, इंग्लिश या माध्यमांतून मराठीपर्यंत येऊन पोचलेल्या अनुवादात प्रतीत होणे अशक्य आहे. पण त्याची समर्पक शब्दयोजना, अपरिचित शब्द व रूपके नाट्योत्कर्ष साधण्यासाठी वापरण्याची – अॅरिस्टॉटलने सापेक्षाने वर्णन केलेली लकब व त्याच्या काव्यमय शैलीतील कल्पकता, गोडवा व सुरेलपणा याची प्रशंसा ग्रीक जाणणाऱ्या इंग्लिश समीक्षकांनी मुक्तकंठाने केली आहे.

पण मराठी अनुवादातही ज्याचा रसास्वाद वाचकांना चाखता येईल असा शैलीचा लक्षणीय गुण सोफोक्लीजमध्ये आहे आणि तो म्हणजे व्याजोक्ती (Irony). पात्रांतील परस्परसंवादात प्रकट होणारी ही व्याजोक्ती नाट्यगुणाला अत्यंत पोषक ठरते. ग्रीक नाटकात, परंपरागत कथानके प्रेक्षकांना ठाऊक असल्यामुळे व कधी कधी नाटककार प्रेक्षकांना आधीच विश्वासात घेत असल्यामुळे तर व्याजोक्ती अत्यंतच हृद्य होते. 'राजा ईडिपस' मध्ये राजा नगरीवरील अरिष्टांना कारणीभूत असलेल्या पाप्याविरुद्ध भयंकर शापवाणी उच्चारीत असतो. तेव्हा हा पापी राजा स्वतःच आहे हे प्रेक्षकांना ठाऊक असल्यामुळे, ही व्याजोक्ती हृदयाला भिडते. व्याजोक्तीप्रमाणे व्याजगर्भ प्रसंगही निर्माण करण्यात सोफोक्लीज अत्यंत निपुण आहे. 'इलेक्ट्रा'त इजिस्थस आपल्या मते ऑरेस्टीजच्या शवावरचे आच्छादन हर्षोत्फुल्ल होऊन बाजूला करायला जातो. पण प्रेक्षकांना माहीत असते की ते क्लायटेम्नेस्ट्राचे शव होते. ते पहाताच इजिस्थसला जो धक्का बसतो, त्याची कल्पना प्रेक्षकांना आधीच असल्यामुळे त्या प्रसंगातील व्याज–उपरोध मोठा नाट्यपूर्ण ठरतो. कधी कधी ही व्याजगर्भता वाचकांना सुखवून जाते. 'इलेक्ट्रा'त शिक्षक ऑरेस्टीजच्या मृत्यूची बातमी सांगत असताना क्लायम्नेस्ट्रा मनातून आनंदित होते व इलेक्ट्रा शोक करू लागते, तेव्हा वाचकांना ऑरिस्टीज जिवंत आहे म्हणून गुदगुल्या होतात व इलेक्ट्रा पुढे सुखावणार आहे, म्हणून आनंद वाटतो.

सोफोक्लीजचा हा उपरोध त्यांच्या केवळ संवादात व प्रसंगांत नसून त्याची छाया साऱ्या नाटकावर पसरलेली असते. जीवन माणसाची कशी फसवणूक करते, त्याला कशा हुलकावण्या देते, हे जणू सोफोक्लीजला वारंवार सूचित करावयाचे असते. देववाणीचे भाकित टाळण्यासाठी ईडिपस पित्यापासुन दूर जाऊ पाहतो व नेमका पितृवधाच्याच पापात येऊन पडतो. पुढे पाप्याला शोधण्यासाठी व दडण्यासाठी आटापिटा करतो व त्याचे फळ म्हणून स्वतःच दंड्य अपराधी ठरून बसतो.–असा उपरोध (Irony) माणसाचा नेहमी पिच्छा पुरवीत असतो, असे दाखवून सोफोक्लीज नाट्यगुणांची वृद्धी करतो.

असा होता सोफोक्लीज. त्याची नाटके त्यांच्या गुणवत्तेमुळे समकालीनांत अत्यंत लोकप्रिय होती व तदनंतरही त्याची लोकप्रियता वाढतच गेली. इंग्लिश कवी शेली याच्या खिशात, त्यांच्या मृत्युसमयी सोफोक्लीजच्या नाटकांचे पुस्तक होते. मॅथ्यू आर्नल्ड या इंग्लिश कवीने पुढील शब्दांत त्याला भावपूर्ण प्रशंसापुष्पे अर्पण केली आहेत.

> Even balanced soul
> Who saw life steadily and
> saw it whole
> The mellow glory of
> the Attic stage
> Singer of sweet Colonus
> and it's child

अनुक्रमणिका

"समतोल वृत्तीच्या या नाटककाराला जीवनाचे सर्वांगानी संपूर्ण, सम्यक् दर्शन सतत होत राहिले होते. ग्रीक रंगभूमीची परिपक्व रसाळता त्याच्यात एकवटली होती. कोलोनसच्या या पुत्राने त्या भूमीच्या माधुर्याची गाणी गायिली."

सोफोक्लीजच्या व्यक्तिमत्त्वाचे व नाटयकलेचे किती यथार्थ वर्णन आहे हे!

या संग्रहात समाविष्ट केलेल्या चार नाटकांपैकी 'अँटीगनी' हे सोफोक्लीजने प्रथम लिहिले असावे असा अंदाज, समीक्षकांनी सोफोक्लीजची भाषाशैली, नाटयतंत्र वगैरेंचा अभ्यास करून, बांधला आहे. थीब्सचा राजा ईडिपस याच्या जीवनावर सोफोक्लीजने तीन नाटके लिहिली व ती तीनही या संग्रहात आहेत. मात्र ती सोफोक्लीजने एकाच वेळी पाठोपाठ लिहिली नसावीत. ऐतिहासिक कालानुक्रमाने राजा ईडिपस, कोलोनसमध्ये ईडिपस व अँटीगनी असा क्रम ठरतो. कारण राजा ईडिपसमध्ये, ईडिपसच्या जन्मरहस्याचा गौप्यस्फोट व अधःपात दाखवला आहे. कोलोनसमध्ये त्याच्या निर्वाणाचे वर्णन आहे. व अँटीगनीमध्ये ईडिपसच्या मृत्यूनंतर त्याच्या दोन पुत्रांनी राज्यासाठी आपापसांत लढून एकमेकांचा वध केल्यानंतरचे वृत्त आहे. पण सोफोक्लीजने मात्र 'अँटीगनी' प्रथम लिहिले, नंतर 'राजा ईडिपस' व शेवटी 'कोलोनसमध्ये ईडिपस' हे लिहिले व ते नाटक त्याच्या मृत्यूनंतर रंगभूमीवर आले.

अँटीगनी सुमारे इ. स. पू. ४४१ त लिहिले असावे. अगदी पहिल्या प्रयोगापासूनच हे नाटक लोकप्रिय झाले असावे. सोफोक्लीजच्या मृत्यूनंतरही त्याचे पुष्कळ प्रयोग अथेन्समध्ये झाले. ग्रीक वक्ता डेमॉस्थेनीस याने या नाटकाचा प्रशंसापूर्ण उल्लेख केला आहे नंतर या नाटकाची इतर भाषांतून भाषांतरेही झाली. आधुनिक युगात अँटीगनीच्या 'शासकीय जुलमाशी झुंज' या मध्यवर्ती कल्पनेमुळे त्याचे आकर्षण वाढत्या प्रमाणावर असलेले दिसते. कोर्नेय व ज्यां अनुई या फ्रेंच नाटककारांनी फ्रेंचमध्ये अँटीगनीवर नाटके लिहिली. ज्यां अनुई याचे नाटक रंगभूमीवर आले तेव्हा तत्कालीन फ्रेंच राजवटीचे क्रेओनच्या राजवटीशी असलेले साम्य प्रेक्षकांना प्रतीत झाल्यामुळे ते खूपच गाजले. या नाटकाचा मराठी अनुवादही मराठी रंगभूमीवर नुकताच आला होता.

अँटीगनीचे साधे, सरळ कथानक तीन संघर्षात्मक धाग्यांनी गुंफले गेले आहे. संघर्ष हा नाटयाचा आत्मा आहे. बाह्य व अंतर्गत असे दोन्ही प्रकारचे संघर्ष रेखाटण्यात सोफोक्लीज फार कुशल होता. थीब्सच्या राज्यावर हक्क मिळवण्यासाठी पॉलिनायसिस हा ईडिपसचा पुत्र, आणखी सहा अन्य राजांची मदत घेऊन, थीब्सवर चालून आला व त्या युद्धात आपल्या भावाकडून मारला गेला, त्याचा भाऊही मृत्युमुखी पडला. क्रेओन या मुलांच्या मामाच्या हाती मग सत्ता येते. तो थीब्सच्या बाजूने लढलेल्या व रणांगणावर देह ठेवलेल्या पुत्राचे यथायोग्य अंत्यसंस्कार करतो, पण देशद्रोही ठरलेल्या पॉलिनायसिसचा देह कुत्र्यागिधाडांकडून खाल्ला जावा म्हणून त्याचे दफन करण्यास मनाई करतो. दफनाचा प्रयत्न करणारास मृत्युदंडाची शिक्षा त्याने फर्मावलेली आहे. ईडिपसची कन्या अँटीगनी ही मृतांबद्दल आदर व बंधुप्रेम यांनी प्रेरित होऊन ते दफनाचे कार्य करण्यास सिद्ध होते; पण तिने शासनाचा आज्ञाभंग केल्यामुळे क्रेओन तिला मृत्यूदंडाची शिक्षा देतो. दुसरा धागा क्रेओनचा पुत्र हीमॉन याच्या अंतःकरणातील पितृनिष्ठा व भावी वधू अँटीगनी हिच्याबद्दलची प्रीती यांमधला संघर्ष व नंतर त्यानें पतकरलेला मृत्यू; तिसरा धागा, पत्नीला व पुत्राला मुकल्यामुळे क्रेओनच्या जीवनात अवतरलेल्या शोकान्तिकेचा.

शीर्षकावरून ही शोकात्मिका अँटीगनीची असावी, असा साहजिकच ग्रह होतो. पण नाटक अर्ध्यावर आल्यानंतर अँटीगनी रंगमंचावरून नाहीशी होते व नंतर नाटककार आपले लक्ष क्रेओनवर केंद्रित करताना दिसतो. यावरून असे वाटते की, सोफोक्लीजला आपले शोकनाटय दोन मध्यवर्ती पात्रांभोवती उभारावयाचे होते. अँटीगनीच्या दीडपट ओळी संवादात क्रेओनच्या वाटयाला आलेल्या आहेत. क्रेओनची भूमिका जास्त क्रियाशील (dynamic), बदलती व भिन्नभिन्न भावना प्रकटवणारी आहे. शिवाय ॲरिस्टॉटलला अभिप्रेत असा वीर-नायक क्रेओन आहे. यादवी युद्धाच्या अरिष्टांतून नगरीला बचावून त्याने शांतता प्रस्था-

पित केली आहे. त्याच्या या थोरवीचे गोडवे नागरिकवृंद आरंभी गाताना दिसतात. पण हा अनेक गोष्टींत महान असलेला वीर पुरुष आपल्या स्वभावातील काही त्रुटींमुळे प्रमाद करतो व परिणामी दुःखी होतो. तो ज्या मूल्यांना चिकटून रहाण्याचा हट्ट धरतो, ती मूल्ये शाश्वत नसतात. ती सत्तेची प्रतिष्ठा किंचित काल सांभाळताना दिसली, तरी अखेरीस सत्ता कोलमडून पडण्यासच कारणीभूत होतात. क्रेओनला आपल्या सत्तेचा, शासनाचा उपमर्द सहन होत नाही. तो करणाऱ्या अँटीगनीला, ती भावी पुत्रवधू असूनही, तो मृत्युदंड ठोठावतो. पण अँटीगनी ज्या मूल्यांसाठी झगडत आहे, ती मूल्ये चिरंतन आहेत. मृतांविषयी आदर, कुलाची प्रतिष्ठा संभाळण्याची तळमळ व बंधुप्रेम यांनी ती प्रेरित झालेली आहे. क्रेओन या Dike ला (शाश्वत मूल्याधिष्ठित न्यायतत्त्व) जुमानीत नाही व म्हणून त्याच्या जीवनाची शोकांतिका होते. अँटीगनी व हिमॉन यांच्याबद्दल अपार करुणा वाचकाला वाटते व क्रेओनचा कर्मभोग व त्याची अखेरची शरणागती पाहून वाचक भयचकित होतो. पत्नी व पुत्र यांची शवे पाहून व आपले जीवनही मातीमोल झाल्याचे जाणवून क्रेओन अगतिक होतो, नैराश्याने त्याचे मन जीवनाला विटून जाते.

पण वृंदाने आपल्या भरतवाक्यात या नैराश्यातून व अगतिकतेतून बाहेर पडण्याचा मार्ग अखिल मानवजातीला सुचवून, वाचकांच्या मनातील प्रक्षुब्ध भावनांचे विरेचन केले आहे. वृंद म्हणतो,

"शहाणपणाने वागणे ही माणसाच्या सौख्याची गुरुकिल्ली आहे. देवांच्या पुरातन कायद्यापुढे शहाण्या माणसाने मान वाकवावी. अहंकार व स्वतः–बद्दलची प्रौढी यांचे फळ म्हणजे नियतीचे निर्घृण फटके. वेळीच सावध व्हावे माणसाने, नाहीतर शहाणपण येण्यापूर्वीच वार्धक्य येऊन ठाकण्याचा संभव."

ग्रीकांच्या मते ही शहाणपणाची वागणूक म्हणजे देवांबद्दल, शाश्वत मूल्यांबद्दल आदर बाळगणे, मानवी मनातील अंतःप्रवृत्तींची कदर करणे, मृतांबद्दल आदर ठेवणे, कौटुंबिक लागेबांधे, उमलती प्रीती यांना भलत्या अभिनिवेशाने पायदळी न तुडवणे. या प्रस्थापित निष्ठांत देवांचे अधिष्ठान आहे. त्या शाश्वत आहेत; कधीही जीर्णशीर्ण होणाऱ्या नाहीत.

सोफोक्लीजचे व्यक्तिस्वभावदर्शन त्याच्या इतर नाटकांप्रमाणे, या नाटकातही रेखीव व सखोल आहे. त्याची व्यक्तिचित्रे नेहमीच ठसठशीत, आपल्या वैशिष्ट्यांनी उठून दिसणारी असतात.

तिच्या नावावरूनच नाटकाला शीर्षक दिल्यामुळे, अँटीगनी हे प्रमुख, मध्यवर्ती पात्र साहजिकच ठरते. अँटीगनी ही एक अत्यंत धीरोदात्त, स्वकर्तव्यनिष्ठेसाठी प्राणाचा होम करण्यास तयार असणाऱ्या अशा कोमल युवतीची व्यक्तिरेखा आहे. तिच्या परंपरागत कथेत सोफोक्लीजला हृद्य शोकनाट्याचे बीज दिसले व त्याचा उत्कृष्ट परिपोष करून त्याने कौशल्याने त्यातून चित्ताचा वेध घेणारी अशी श्रेष्ठ शोकात्मिका निर्माण केली. अँटीगनी जपत असलेली शाश्वत मूल्ये व जुलमी सत्ताधीशाची क्षणभंगुर, अभिनिवेशी मूल्ये यांच्यातल्या जीवघेण्या संघर्षाने या नाटकात नाट्यगुणांचा परमोत्कर्ष झाला आहे.

मृतबंधूबद्दलचे आपले अखेरचे कर्तव्य करण्यासाठी अँटीगनी राजाचा आदेश मोडून, प्राणाची बाजी लावण्यास उद्युक्त होते. मृतांचे अंत्यसंस्कार यथाविधी झाले नाहीत तर त्यांच्या आत्म्यांना परलोकी प्रवेश मिळत नाही, अधोलोकातील स्टिक्स नदीच्या अलिकडील तीरावर त्यांना घुटमळत थांबावे लागते अशी प्राचीन ग्रीकांची प्रामाणिक समजूत होती. अर्थात् आधुनिक युगातील लोकांच्या अंतःकरणाला ती भिडणे शक्य नाही; पण सुमारे अडीच हजार वर्षांपूर्वीच्या काळाच्या संदर्भात तिचा विचार केला म्हणजे तिच्या मताने या अत्यंत महत्त्वाच्या गोष्टीबद्दलची तिची तळमळ व प्राणांतिक धडपड मनाची पकड घेते व तिच्याबद्दलची करुणा व आदर परिसीमा गाठतात. ती रंगभूमीवरून मृत्युमुखी पडण्यासाठी अंतर्धान पावल्यावर सुद्धा तिच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वाचा पगडा नाटकाच्या अखेरपर्यंत मनावर राहतो व नाटकाचे शीर्षक सार्थ असल्याची खात्री पटते.

क्रेओन हे दुसरे महत्त्वाचे पात्र. ही शोकनाट्याच्या नायकाला साजेशी व्यक्तिरेखा आहे, हे आपण पाहिलेच. त्याच्यामध्ये पुष्कळ गुणविशेष आहेत; पण काही त्रुटीही आहेत व त्यामुळे तो प्रमाद करतो.



अनुक्रमणिका






नुकतेच स्थिरस्थावर झालेल्या थीब्सच्या राज्यावर त्याची सत्ता अजून पुरेशा भक्कमपणे स्थापन झालेली नाही, असे त्याला वाटत असावे. म्हणून अँन्टीगनी आपल्या सत्तेला धक्के देत आहे हे पाहून तो खवळतो. आपले हुकूम पाळले गेले पाहिजेत, याबद्दल तो फाजील खबरदारी घेतो व आज्ञाभंगाला अतिरेकी, निर्घृण शिक्षा ठोठावतो. आपले स्थान टिकविण्याच्या हट्टात त्याला मृतांबद्दलचा आदर, कौटुंबिक जिव्हाळा यांचा विसर पडला आहे. यामुळे तो ऱ्हस्व दृष्टीचा व क्षुद्र वृत्तीचा भासतो व अँन्टीगनीच्या उदात्त, निःस्वार्थी चित्रापुढे तो फिक्का पडतो. त्याच्या मुलाच्या, हिमाॅनच्या संयमित व विवेकी वर्तनामुळे तर त्याचा जळफळाट व थयथयाट फारच हिणकस ठरतो. साधी माणुसकी त्याने झुगारून दिली आहे. भावी स्नुषा व स्वतःचा पुत्र यांच्या भावनांची त्याला अजिबात कदर नाही. या त्याच्या अविवेकी, पाखंडी, सत्तामदांध वागणुकीमुळे त्याची शोकांतिका होते. पुत्र व पत्नी यांना तो मुकतो. शरणागती पतकरून मृताचा दफनविधी करण्यास त्याला तयार व्हावे लागते. आरंभीची अहंमन्यता व अरेरावी मावळून तो उद्गार काढतो : "सारे, सारे माझ्या हातातून निसटून गेले आहेत"

"माझ्या मस्तकावर कोसळलेला हा कर्मभोगाचा
भार हलका होण्याची आशाच नाही."

अँन्टीगनीच्याही जीवनाची शोकांतिका होते, पण शाश्वत मूल्यांसाठी तिने प्राण पाखडून टाकलेले असल्यामुळे तिची आध्यात्मिक उंची मरणोत्तर वाढते. तिच्या निष्ठेपुढे व धैर्यापुढे आदराने मान लवते; पण क्रेओन मात्र सत्तेच्या धुंदीत केलेल्या प्रमादांमुळे खुजा ठरतो.

इस्मिनी अँन्टीगनीची बहीण. अँन्टीगनीच्या दृढ निर्धाराला व प्रखर निष्ठेला उठाव देण्यासाठीच की काय, सोफोक्लीजने इस्मिनी दुबळी, भित्री, आत्मविश्वासाला पारखी अशी रेखाटली आहे. सत्ताधीशांच्या हुकुमाविरुद्ध जाण्याचे धैर्य तिच्या अंगात नाही. ती प्रतिकूल परिस्थितीला शरण जाणे पतकरते. स्वकर्तव्याची तिची जाणीव अँन्टीगनीच्या जाणीवेसारखी उच्च पातळीवर जाऊ शकत नाही. शिवाय आत्मविश्वासाला ती संपूर्णपणे पारखी असल्यामुळे, "आपण पडलो बायका ! शिवाय पुरुषांशी झगडणे व्यर्थ आहे." असे दुबळे उद्गार ती काढते. पण तरीही तिच्या व्यक्तिचित्राला उदात्ततेची डूब आहे. तिची आपल्या बहिणीवर अढळ प्रीती आहे. तिच्याशी एकनिष्ठ राहून, 'माझाहीपण आहे या मृताच्या दफनात भाग' असे ती क्रेओनला सांगते व अँन्टीगनीबरोबर दंड भोगण्यास तयार होते. तेव्हा अँन्टीगनी तिला काहीशा निष्ठुरपणे झिडकारते ; पण वाचकांना मात्र तिच्या प्रेमळ एकनिष्ठतेबद्दल आदर वाटतो.

हीमाॅन हा क्रेऑनचा पुत्र, अँन्टीगनीचा वाग्दत्त वर, क्रेओनच्या स्वार्थी, निष्प्रेम, निर्घृण वृत्तीच्या पार्श्वभूमीवर या तरुण युवकाचा निष्ठावंत, विवेकी शांत स्वभाव उठून दिसतो. पितृनिष्ठा व भावी वधूबद्दल प्रीती या दोन भावनांच्या कात्रीत तो सापडला आहे. शेवटी दोन्ही निष्ठांना तो सांभाळताना दिसतो. पित्याचा उपमर्द करणे अनुचित असल्यामुळे तो त्याचा नाना प्रकारे अनुनय करतो ; क्रेओन त्याची विनवणी धुडकावून लावतो, त्याला 'बायल्या' म्हणून टोमणे मारतो. क्षणभर हिमाॅनचा तोल सुटतो. तो बापावर तलवार उगारतो – पितृनिष्ठा त्याला आवरते ; पण भावी वधूशीही त्याला एकनिष्ठ रहावयाचे असल्यामुळे तो आत्मघात करून तिच्या मृतदेहावर कोसळतो.

टायरेसिअस हा अंध भविष्यवादी क्रेओनला सावधगिरीची सूचना देतो. मृताचा अंत्यविधी न झाल्यामुळे त्याच्या होमहवनास व भविष्य वर्तविण्यात अडथळा होत आहे. पण क्रेओन त्याला अपशब्द बोलून झिडकारतो. मग वृद्ध होऊन क्रेओनवर कोसळणाऱ्या भावी अरिष्टाचा उच्चार करून निघून जातो. टायरेसिअसची भविष्यवाणी नेहमीच खरी ठरत असल्यामुळे क्रेओन घाबरतो व वृंद-नायकाच्या सल्ल्याप्रमाणे आपले हुकूम मागे घेतो. या परिवर्तनास टायरेसिअस जबाबदार असल्यामुळे त्याचे पात्र महत्त्वाचे ठरते.

युरिडायसी ही क्रेओनची पत्नी; हीमाॅनची माता. हिची व्यक्तिरेखा अगदी त्रोटक आहे. पुरत्या दहा ओळीही ती बोलत नाही. पण पुत्राच्या मृत्यूची वार्ता ऐकल्यावर तिचे निःशब्दपणे रंगमंचावरून निघून जाणे फार परिणामकारक वाटते. नंतर दिसतो तो तिचा मृत देहच. मरताना पुत्रहत्येबद्दल तिने क्रेओ-

नला शापिल्यामुळे त्याला झालेल्या शिक्षेचा ती एक प्रमुख भाग ठरते व त्यामुळे तिच्या पात्राला महत्त्व येते.

मृतदेहावरचा पहारेकरी या शोकगंभीर नाटकात घटकाभर विनोद निर्माण करतो. कुणीतरी राजाज्ञा-भंग करून मृतदेहाला मूठमाती दिली. त्याचा दोष आपणावर येऊ नये म्हणून तो शब्दांत उलटचा सुलटचा कोलांटचा मारतो. तेव्हा हसू कोसळते. पुढे क्रेओनशी बोलतानाही तो शब्दांवर कोटचा करतोच. हास्यरस निर्माण करणारे, म्हणून हे पात्र लक्षात रहाते. गौण पात्र रेखाटताना असे नाना रंग वापरण्याची सोफोक्लीजला आवड होती.

गायकवृंद, सोफोक्लीजच्या इतर नाटकांतील गायकवृंदापेक्षा जास्त नाटचपूर्ण आहे. कारण कथानकातील बदलत्या परिस्थितीप्रमाणे त्याची प्रतिक्रिया पालटत जाते. आरंभी कथानकाची पार्श्वभूमी स्पष्ट करून तो नगरीत युद्धोत्तर शांती प्रस्थापित झाल्याबद्दल आनंदघोष करतो. अँटीगनीच्या दुःखामुळे तो द्रवतो; पण तिने राजाची आज्ञा पाळावी असा आग्रह धरतो. क्रेओनच्या व हीमॉनच्या संघर्षात वृंद कधी क्रेओनची तर कधी हीमॉनची बाजू घेतो. पण अखेरीस अँटीगनीला झालेल्या घोर शिक्षेने व टायरेसिअसच्या भयंकर भाकिताने वृंदसदस्य बावरतात व क्रेओनला आपले हुकूम फिरवण्याचा सल्ला देतात व क्रेओन तो मानतोही. या प्रमाणे एखाद्या प्रमुख पात्राप्रमाणे गायकवृंद नाटकभर वावरतो.

गायकवृंदाचे या नाटकातले दुसरे महत्त्वाचे कार्य म्हणजे शोक–नाटचातील कारुण्य व कातरता या भावनांचे विरेचन होण्यास साहाय्य करणे. सोफोक्लीजने आपली शोक–नाटचविषयक तात्त्विक भूमिका वृंदाच्या द्वारे, जागोजागी स्पष्ट केली आहे. परमेश्वरी संकेताचा हवाला देऊन वृंद वाचकांच्या मनावरचा ताण सैल करतो. परमेश्वरी संकेत मानवी जीवनात समतोल राखतो. समतोलाचा भंग करणाऱ्याला – क्रेओनला – शिक्षा होते. या संकेतापुढे मानवाची बुद्धी, सत्ता, महत्त्वाकांक्षा, पांगळचा पडतात. क्षणभर मानव या परमेश्वरी संकेतापुढे स्तिमित होतो. पण जीवनाच्या अखेरीस त्याला या संकेताचा उलगडा होतो व सुखदुःखाचा अन्वयार्थ उलगडू लागतो.

सोफोक्लीजच्या कलेच्या इतर पैलूंप्रमाणे त्याचे भाषाप्रभुत्वही या नाटकात चित्त वेधून घेते. या नाटकात त्याच्या कल्पनारम्य, भावमधुर, काव्यमय, प्रसन्न शैलीचा पडताळा ठिकठिकाणी येतो. 'अँटीगनी'तील वृंदाची भावगंभीर गीते (choral odes) तर त्यांतील आशयामुळे व मोहक शैलीमुळे लोकप्रिय झाली आहेत.

वृंदाच्या पहिल्या आनंदघोषाच्या गीताच्या शेवटी सोफोक्लीजची प्रसिद्ध व्याजोक्ती आढळते. वृंद गातो,

"आता युद्ध विसरू या – दुःख विसरू या"

"सारी रात्र मंदिरात डिओनायससच्या जयघोषात नाचू या, गाऊ या,"

पण ती रात्र अँन्टीगनीचा, हीमॉनच्या, राज्ञीचा मृत्यू घेऊन येणार असते व क्रेओनच्या शोकाकुल तडफडीने, नैराश्याने तिची अखेर होणार असते.

दुसऱ्या गीताची त्याच्या भावपूर्ण काव्यात्मतेबद्दल खूप प्रशंसा करण्यात येते. गीतात मानवाच्या प्रगतीची गौरवगाथा आहे. पण मानवाने परमेश्वरी न्यायाचे (Dike) उल्लंघन करू नये अशी भलावणी आहे.

तिसरे गीतही काव्यपूर्ण आहे. शोकांतिकेतील मूलभूत संकल्पनांशी ते संबंधित आहे व भावी अरिष्टाची ते सूचना देते. " ज्यांनी दुःखाची चव अजून चाखली नाही ते धन्य " – हे वृंदाने काढलेले उद्गार आरंभीच्या आनंदी आनंदावर कृष्णछाया आणतात. क्रेओन करीत असलेल्या प्रमादाबद्दल सूचकपणे वृंद म्हणतो,

" देव जेव्हा मानवाला विनाशाप्रत नेत असतो तेव्हा त्या मानवाला उन्मार्ग सन्मार्गासारखा भासतो."

–चौथे गीत प्रणयदेवाच्या प्रभावाबद्दल आहे. पण हे वर्णन उपरोधपूर्ण आहे. वृंदाच्या मते इरॉस (प्रणयदेव) हीमॉनला चुकीच्या मार्गावर नेत आहे.

पाचव्या गीतात वृंदाच्या संमिश्र भावनांचे गमतीदार दर्शन होते. एकीकडे वृंद सत्तेची बाजू घेऊन, अँन्टीगनीला योग्य शिक्षा झाली, असे बाहेरून म्हणतो; पण त्याच्या अंतर्यामी तिच्याबद्दल करुणा दाटली आहे. वृंदाचे वरचेवर उफाळून येणारे (व कंसात घातलेले; कारण क्रेओनविरुद्ध उघडपणे बोलण्याची वृंदाला भीती वाटत आहे)

तिच्याबद्दलचे शोकोद्‌गार वाचकांच्या मनातील अतिरिक्त करुणेचे विरेचन होण्यास मदत करतात.

सहाव्या गीतात सोफोक्लीजच्या प्रतिभेची, कल्पकतेची व काव्यमाधुर्याची अत्युच्च भरारी आहे. क्रेओन मृताचे अंत्यसंस्कार करण्यास व अ‍ॅन्टीगनीला तिच्या गुहेतून बाहेर काढण्यास गेला आहे, तेव्हा आता नगरीतील सारी अरिष्टे टळतील या आनंदात वृंद देवदेवतांना नगरीच्या मदतीस येण्यासाठी साद घालतो.

पण पहिल्या गीताप्रमाणे या गीताच्या अखेरीसही सोफोक्लीजचा व्याजगर्भ उपरोध प्रगट झाला आहे; कारण गीत संपताच दूत हीमॉन व अँटीगनीच्या मृत्यूची वार्ता घेऊन येतो व वृंद पुन्हा उदास होतो. शेवटी राज्ञीचा मृत्यू व क्रेओनचे नैराश्य पाहून वृंद मानवाच्या मूर्ख, आंधळ्या अहंकाराबद्दल व त्याच्या परमेश्वरी न्यायाविरुद्ध झालेल्या प्रमादांबद्दल खेद व्यक्त करतो व नाटकाचा शेवट होतो.

'राजा ईडिपस' हे सोफोक्लीजचे सर्वोत्कृष्ट नाटक. ते इ. स. पू. ४२० ते इ. स. पू. ४१२ च्या दरम्यान केव्हा तरी लिहिलेले असावे. अँरिस्टॉटलने शोकनाट्याच्या विविध पैलूंचे विवेचन करताना, आदर्श शोकनाट्य म्हणून या नाटकातील उदाहरणे ठिकठिकाणी दिली आहेत. कारुण्य व भयचकितता या शोकरसांची निष्पत्ती, भाग्यचक्रभ्रमण व वास्तव परिस्थितीची धक्का देणारी जाणीव, धीरोदात्त पण स्वभावात काही त्रुटी असलेला नायक, कथानकाशी व पात्रांशी समरस झालेला गायकवृंद व कथानकाला वेग आणणारे नाट्यपूर्ण व खटकेबाज संवाद या साऱ्या शोकनाट्यात आवश्यक असलेल्या गुणांचा या नाटकात परमोत्कर्ष झाला आहे.

राजा ईडिपसची कथा पुष्कळच प्राचीन आहे. इ. स. पू. १५०० मधील एका सुवर्ण–मुद्रेवर ईडिपसची आपल्या पित्याशी भेट व स्फिंक्सच्या कूटप्रश्नाला उत्तर देणारा ईडिपस चित्रित केले आहेत. राजा ईडिपसच्या जीवनावर रचलेल्या प्राचीन ग्रीक काव्यातून सोफोक्लीजने आपले कथानक निवडले असावे. इस्किलसने आपल्या 'थीब्सवर सातांची चढाई' या नाटकात थीब्सच्या राजकुलेतिहासातून कथानक निवडले होतेच; राजा ईडिपसची जीवनकथा शोकनाट्याच्या चौकटीत नेमकी बसेल, हे चातुर्याने हेरून सोफोक्लीजने आपल्या रचनाकौशल्याने हे कथानक उलगडीत, फुलवीत, वाचकांची उत्कंठा खेचीत चित्त थरारून टाकणाऱ्या अखेरीस भिडवले आहे.

अँरिस्टॉटलने भाग्याची उलथापालथ व सत्यस्थितीची अंतिम प्रखर जाणीव ही कथानकाची प्रमुख अंगे असावीत, असे म्हटले आहे व याचे उत्तम उदाहरण म्हणून 'राजा ईडिपस'च्या कथानकाचा निर्देश केला आहे. ही उलथापालथ राजा ईडिपसच्या जीवनात तशीच थीब्स् नगरीच्या जीवनातही होताना दिसते. नाटकाच्या प्रारंभी स्फिंक्सच्या संकटातून ईडिपसने सोडवलेली नगरी आनंदोद्‌गार काढते, पण लवकरच ती अरिष्टांनी घेरली जाते व अखेरीस तिचा राजा निर्वासित झाल्यावर ती अनाथ होते. नगरीचा आवडता राजा, तिचे केवळ भूषण असलेला ईडिपस शेवटी तिचे घृणास्पद प्रदूषण ठरतो; तसेच आरंभी राजद्रोही ठरलेला क्रेओन शेवटी नगरीचा पालक होतो व राजाला दंड ठोठावण्याचे कार्य त्याच्याकडे येते. या सर्व उलथापालथीस कारणीभूत असलेली सत्यस्थिती, उत्कंठा ताणली जात असताना, पायरीपायरीने स्पष्ट होत जाते. कथानक जणू दोन पातळ्यांवर आकार घेत असते. वर्तमान काळात ईडिपस, क्रेओन जोकास्टा कथानक पुढे नेत असतात; निरनिराळे निर्णय घेत असतात; पण अंतिम शोकात्मक निर्णय भूतकाळातील व्यक्तींनी – ईडिपसचा पिता, दोन मेंढपाळ, कॉरिंथचा राजा –यांच्या आचरणाने ठरून गेलेला असतो. नियती आपले संकेत मानवांकडून पुरे करीत जाते. सत्यस्थिती उघडकीस येण्याचे कारण, ईडिपसचा आग्रही, अहंकारी स्वभाव व सत्यशोधनाची अतिरिक्त जिद्द. सोफोक्लीजची पात्रे नियतीच्या हातची बाहुली वाटत नाहीत. त्यांना स्वतःचे असे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व असते व आपल्या मनस्वी वर्तनानेच ती शेवटी आपला शोकान्त घडवून आणतात. कथानकाच्या विकासात पदोपदी वाढत जाणारी उत्कंठा व ठिकठिकाणी, घटनांत व संवादांत व्यक्त होणारा उपरोध यांनी नाटकाला पराकाष्ठेची उत्कटता व हृद्यता प्राप्त झाली आहे.

नाटकातील कथानक रचना–कौशल्याला प्रभावी व्यक्तिदर्शनाची जोड मिळाली आहे. मानवाची ईप्सिते व हेतू, त्याला घेरणारी प्रतिकूल परिस्थिती या दोहोंच्या कैचीत सापडलेल्या त्याच्या मनोव्यापारांची सूक्ष्म, सखोल समज व त्यांची संवादांत व आचरणात समर्पक अभिव्यक्ती हे सोफोक्लीजच्या स्वभावरेखनाचे मुख्य गुण आहेत.

सर्वांत महत्त्वाचे, शोकनाट्याचे केंद्रस्थान असे पात्र म्हणजे राजा ईडिपस. याची व्यक्तिरेखा रंगवताना सोफोक्लीजच्या कलेचा षोडश कलांनी विकास झालेला प्रत्ययास येतो. राजा ईडिपस हे एक भव्य, दिव्य व्यक्तिचित्र आहे. त्याच्यापुढे त्याच्या भोवतालची माणसे, आपापल्या परीने मोठी असली, तरी खुजी वाटतात. तो रंगभूमीवर प्रथम दृष्टीस पडतो तोच अत्यंत तेजस्वी, आत्मविश्वासाने रसरसलेला, बुद्धिमान्, करारी, करीन ती पूर्व दिशा वृत्तीचा. स्फिंक्सच्या अरिष्टांतून आपल्या चातुर्याने नगरीला त्याने एकदा वाचवले आहे. आताच्या प्रदूषणातून पाप्याला दंडून, तिला मुक्त करणाच्या आपल्या सामर्थ्याची त्याला खात्री आहे. पण या बहुगुणसंपन्न राजाचे जीवन त्याच्या मनस्वी, हट्टी स्वभावामुळे शेवटी मातीमोल होते. थीब्सच्या भूतपूर्व राजाला, जोकास्टाच्या प्रथम पतीला, लेइअसला ठार मारणारा कोण होता, बाल ईडिपसला, कॉरिंथच्या राजाच्या स्वाधीन करणारा कोण होता, त्याला ते मूल कोठून मिळाले, या रहस्यांचा शोध घेताघेता शेवटी तो या घोर सत्याप्रत येऊन पोचतो की, जोकास्टाने 'पितृवध करील' या भीतीने टाकून दिलेला मुलगा म्हणजेच कॉरिंथच्या राजाने वाढवलेला ईडिपस–आताचा राजा ईडिपस–ज्याच्या हातून पितृवध झाला व ज्याचा आपल्या मातेशी–जोकास्टाशी विवाह झाला–जोकास्टाला सत्य उघडकीस येते आहे अशी शंका येताच, काकुळतीस येऊन, अधिक शोध न करण्याची विनंती ती ईडिपसला करते; पण ईडिपस आपलाच हट्ट चालवतो व शेवटी आपल्याच पायावर कुऱ्हाड पाडून घेतो.

आणि मग एखाद्या डेरेदार वृक्षावर वीज कोसळावी; तो उन्मळून पडावा, तसा ईडिपस मोडून पडतो. आपल्या पापाचे दर्शन याउपर नको म्हणून तो आपले डोळे फोडून घेतो व आपण घोषित केलेली, निर्वासित होण्याची, शिक्षा आपणास देण्यासाठी क्रेओनला विनवतो. त्याची ही दशा वर्णन करताना सोफोक्लीजने आपले सारे भाषाप्रभुत्व जणू पणास लावून वाचकांच्या काळजास हात घातला आहे. वैभवाच्या, सत्तेच्या, अस्मितेच्या शिखरावर असलेला राजा आंधळा, दुबळा, निर्वासित, भणंग भिकारी झालेला पाहून वाचकाच्या अंतःकरणाला करुणेने पीळ पडतो. तसेच, नियतीचा हा अद्भुत खेळ पाहून त्याचे हृदय कातर व विस्मित होते. शोकनाट्याचा हा थोर नायक, स्वभावविशेषामुळे काही प्रमाद हातून घडल्यामुळे विनाशाप्रत जातो; पण त्या विनाशाला तो तोंड देत असतानाही त्याची महात्मता आणि त्याच्यातील दिव्यत्वाचा अंश प्रतीत झाल्याशिवाय रहात नाही. त्यामुळे वाचकाच्या मनात प्रथम प्रक्षुब्ध झालेल्या कारुण्य कातरतेचे उन्नयन होऊन त्याला मानवाच्या गौरवाची जाणीव होते व त्याचे मन एक प्रकारच्या उच्च, आल्हादमय पातळीवर विहार करू लागते.

जोकास्टाची व्यक्तिरेखा ईडिपसइतकी प्रभावी नसली, तरी तिच्या व्यक्तिमत्त्वाचा दबदबा जाणवल्याशिवाय रहात नाही. आपल्या पतीला व भावाला – क्रेओनला– ती वेळोवेळी, त्यांचा कलहात तोल सुटू लागला की, आवरते. ती स्वतंत्र विचार करणारी आहे. तिचा देववाणीवर विश्वास नाही. माणसाने भविष्याच्या भीतीखाली वावरू नये. वर्तमान काळात आपणास योग्य वाटेल तेच करावे अशी तिची विचारसरणी आहे. पण भूतकालचा शोध घेण्याच्या हट्टापासून ती ईडिपसला परावृत्त करू शकत नाही. अगतिक होऊन ती अॅपॉलोला, ईडिपसला भूतकाळाच्या भीतीपासून मुक्त करण्याची विनंती करते. तिच्या प्रार्थनेला उत्तर म्हणून की काय कॉरिंथहून दूत येतो. ही घटना सोफोक्लीजच्या प्रसिद्ध उपरोधाने ओतप्रोत भरलेली आहे. कॉरिंथचा राजा आजारी पडून मृत्यू पावल्याची बातमी ऐकून जोकास्टाला, ईडिपस पितृवध करील ही देववाणी खोटी ठरली म्हणून आनंद होतो; पण अॅपॉलोने दूताकरवी ईडिपसची भयापासून मुक्ती केली नाही तर त्याला विनाशाच्या गर्तेत पार बुडविले आहे. कारण हा दूतच ईडिपसच्या जन्माबद्दल

गौप्यस्फोट करतो. ईडिपसला वाचविण्याचे जोकास्टाचे प्रयत्न व्यर्थ होतात, शेवटी ओंगळ सत्य बाहेर पडणार असे दिसताच, निःस्तब्धपणे ती रंगभूमीवरून निघून जाते – नंतर वार्ता येते ती तिच्या आत्मघाताची.

क्रेओन हा जोकास्टाचा भाऊ; अँन्टीगनीमधल्या क्रेओनपेक्षा हा अगदीच निराळा आहे. डेल्फीहून नगरीवरील अरिष्ट निवारण्याचा उपाय सुचवणारी देववाणी तो मोठ्या उत्साहाने घेऊन येतो; पण लवकरच त्याच्या उत्साहावर पाणी पडते; कारण टायरेसिअस या भविष्यवाद्याने नगरीच्या प्रदूषणाचे कारण असलेला पापी राजाच आहे असे चिडून सांगितले तेव्हा राजाने ही क्रेओनची चिथावणी आहे असा राजद्रोहाचा आरोप त्याच्यावर केला. पण शेवटी देववाणी खरी आहे हे सिद्ध झाल्यावर ईडिपस केविलवाणा होऊन आता राज्यपाल झालेल्या क्रेओनची आपणास हद्दपार करण्याविषयी विनवणी करू लागतो. या वेळी क्रेओन जरा ताठपणे वागला तरी ईडिपसला, पूर्वीचा राग मनात ठेवून, ठोकरीत नाही म्हणून क्रेओनबद्दल आदर वाटतो. ईडिपसपासून त्याच्या मुलींना बाजूला करताना तो अधिकारवाणीने म्हणतो,

"पुरे तुझे वर्चस्व गाजवणे आता, पूर्वीची सत्ता क्षणभंगूरच ठरली ना."

तो स्वतः सत्ता गाजवण्याबाबत सावध आहे. ईडिपसला शिक्षा द्यायची तर पुन्हा देवांना कौल लावला पाहिजे असे तो म्हणतो. त्याची ही सावधगिरी व संयम, ईडिपसच्या प्रारंभीचा फाजील आत्मविश्वास व सत्तामद यांच्या विरोधात उठून दिसतो. पुढे अँन्टीगनीला शिक्षा करण्याच्या वेळी मात्र हा संयम सुटतो व त्याचा दण्ड त्याला भोगावा लागतो.

टायरेसिअस याची व्यक्तिरेखा, 'अँन्टीगनी' प्रमाणे, ह्या नाटकातही आदरणीय, विश्वसनीय अशी रंगवली आहे. आपल्या सामर्थ्यांबद्दलची, समाजातील आपल्या महत्त्वपूर्ण स्थानाबद्दलची जाणीव त्याला आहे. म्हणून ईडिपस त्याला अपमानकारक टोमणे मारू लागल्याबरोबर तो क्रोधास चढतो व तेढी उत्तरे देतो.

कथानकाच्या परिपोषात त्याला महत्त्वाचे स्थान आहे, कारण स्वतः ईडिपस हा नगरीवरील अरिष्टाचे मूळ आहे, हे उघडपणे तोच प्रथम बोलतो; शिवाय ईडिपसची त्याच्याशी उद्दाम वागणूक, क्रेओनशी झालेल्या त्याच्या बेताल वर्तनाप्रमाणे व जोकास्टाबद्दल त्याने काढलेल्या अनुदान उद्गारां प्रमाणे ( राज्ञीला लखलाभ होवो तिचे खानदानी घराणे ! मी एखाद्या गुलामाच्या पोटचा आहे असे ठरले तरी मला शरम नाही वाटणार त्याची ) त्याचा अहंकार व सत्तामद प्रमाणाबाहेर गेल्याचे स्पष्ट करते व त्याचा परिणाम त्याला भोगावा लागेल असे वाचकांना वाटू लागते.

या नाटकातील दोन मेंढपाळ खरे म्हणजे दुय्यम पात्रे आहेत; पण त्यांचे महत्त्व मोठे आहे; कारण त्यांच्यामुळेच शेवटी गौप्यस्फोट (Recognition) होऊन ईडिपसचे भाग्यचक्र फिरणार आहे. सोफोक्लीजने ही पात्रे फार कौशल्याने रेखाटली आहेत व दोघांच्या स्वभावांतली भिन्नता स्पष्ट केली आहे. कॉरिंथहून आलेला मेंढपाळ हा जरा गमतीदार आहे. 'अँटीगनीतल्या पहारेकऱ्यासारखा तो बातमी सांगताना शब्दांच्या कोलांट्या उड्या मारीत राहणार; पण पहारेकऱ्याला शिक्षेची भीती होती, तर या कॉरिंथच्या दूताला बक्षिसाची लालसा आहे. त्याच्या निवेदनाच्या या प्रसंगात सोफोक्लीजचा उपरोध पूर्णांशाने प्रगटला आहे. कॉरिंथचा राजा आजाराने मरतो हे ऐकून जोकास्टा आनंदाने म्हणते, "पहा, देववाणी खोटी ठरली, त्या राजाला काही त्याच्या पुत्राने– ईडिपसने मारले नाही." पण मग ईडिपस म्हणतो, "अर्धा भाग खोटा ठरला, बाकीच्या अर्ध्याची– मातेशी विवाह होईल– या देववाणीची मला भीती वाटते." पण कॉरिंथचा दूत ती भीती दूर करण्यासाठी म्हणतो,

"पण कॉरिंथचा राजा तुमचा पिता नव्हताच मुळी, तुम्हाला त्याने आपला पुत्र म्हणून वाढवले; एवढेच. मीच त्याच्या स्वाधीन केले होते तुम्हाला, तुम्ही लहान असताना." व भीतीची छाया अधिक गडद करतो.

ईडिपसने खोदून विचारल्यावर, थीब्सच्या एका मेंढपाळाने पायावर खिळा टोचल्याची खूण असलेले

मूल, म्हणजेच ईडिपस, आपल्याला दिल्याचे तो कबूल करतो.

मग त्या थीब्सच्या मेंढपाळाची शोधाशोध सुरू होते व त्याचे आगमन रंगमंचावर होते.

हा मेंढपाळ कॉरिंथिअन मेंढपाळापेक्षा अगदी निराळा आहे. कॉरिंथचा मेंढपाळ स्वतःवर खूष आहे; आपल्या सगळ्या बातम्या मोठ्या चवीने देत आहे; पण थीब्सचा मेंढपाळ येतो तोच बावरलेला, घाबरलेला; तो प्रथम ईडिपसच्या प्रश्नांना उत्तरे देण्याचे नाकारतो. पण ईडिपस आता हट्टाला पेटलेला असतो. तो त्याला शिक्षेची, मरणाची भीती घालतो.

शेवटी दयेच्या पोटी, जोकास्टाने दिलेला तिचा पुत्र आपण कॉरिंथच्या मेंढपाळाला दिल्याचे तो कबूल करतो; पुढे हा असा अनर्थ होईल—आपण वाचवलेले मूल पुढे पितृवध करील. व आपल्या मातेशी विवाह करील— याची त्या बिचाऱ्याला काय कल्पना? लेइअसला मारणारा माणूस तोच हा आता राजा झालेला ईडिपस हे ज्या वेळी लक्षात आले त्या वेळीच तो थीब्स सोडून परागंदा झाला होता; पण ईडिपसने जंग जंग पछाडून त्याला शोधून आणले व त्याच्या तोंडून सारे भीषण सत्य वदवून घेतले.

त्या भयंकर क्षणी जोकास्टा निःशब्दपणे निघून जाते तसा थीब्सचा मेंढपाळही स्वतःची व ईडिपसची कीव करीत निघून जाते तो अल्पकाळच रंगमंचावर असतो; पण त्याची व्यक्तिरेखा आपल्या मनावर कायमचा ठसा उमटवून जाते.

या नाटकातील गायकवृंद, अॅरिस्टॉटलच्या दंडकाप्रमाणे नाटकातले जणू एक पात्रच बनून, कथानकाशी व पात्रांशी समरस होऊन वावरतो. थीब्सच्या राजनिष्ठ व धर्मनिष्ठ, प्रतिष्ठित नागरिकांचा हा गायकवृंद आहे. राजा ईडिपसच्या बुद्धिमत्तेचा व कर्तृत्वाचा त्यांना अभिमान आहे. स्फिंक्सच्या अरिष्टाप्रमाणे सांप्रतच्या रोगराईच्या अरिष्टातूनही तो नगरीला वाचवील याची त्यांना खात्री आहे. मेंढपाळाच्या तोंडून ईडिपस लहानपणी थीब्समधून कॉरिंथला नेला गेला हे ऐकून आपला राजा आपल्या भूमीतला; कुणी परका नाही, असे वाटून त्यांना हर्ष होतो. पण यातील उपरोध, वाचकांच्या लक्षात येतो, तसा त्यांच्या लक्षात येत नाही. ईडिपस, थीब्सचा होता म्हणूनच त्याच्या हातून पाप घडून तो नगरीचे प्रदूषण बनला, हे भीषण सत्य पुढे उघडकीस येते, त्याची चाहूल लागून जोकास्टा एकदम निघून जाते, तेव्हा वृंद आशंकित होतो व तिच्या मृत्यूची वार्ता आल्यावर व्याकूळ होतो. ईडिपसचा शोक, त्याचे अंधत्व तर त्यांच्या काळजात हात घालते. कारुण्य व कातरता या रसांची परमावधी त्यांनी वेळोवेळी गाइलेल्या गंभीर गीतांतून होते, व मग त्या भावनांचे विरेचन, सोफोक्लीजने त्यांच्या मुखी घातलेल्या तत्त्वमीमांसेने होते. याप्रमाणे हा श्रेष्ठीवृंद, राजा ईडिपसच्या भाग्यचक्राशी व कथानकातील घटनांशी दृढतेने निगडित असलेला असतो.

कथानकाची पार्श्वभूमी, नगरीवरील अरिष्टे व देवांचा कौल घेण्यासाठी क्रेओनचे डेल्फीला प्रयाण, वृंद आपल्या कथनात स्पष्ट करतो. नंतरच्या गीतात मानवाच्या जीवनाची शोकांतिका का होते, याचे सूचक स्पष्टीकरण आहे. मानवाचा स्वतःच्या कर्तृत्वाबद्दलचा फाजील विश्वास, अहंकार व दुसऱ्यावर जुलमी सत्ता गाजविण्याची प्रवृत्ती ही त्याच्या नाशास कारण होते. ईडिपस व जोकास्टा आपापल्यापरी हा फाजील आत्मविश्वास जागोजागी दाखवतात. नियतीच्या अनाकलनीय खेळाला खीळ घालण्यास मानव उद्युक्त होईल, तर उलट तो आपला विनाश जास्त समीप आणील. ईडिपस कॉरिंथ सोडून थीब्सला आला म्हणून नियतीचे कार्य सुलभ झाले, म्हणून वृंद शेवटी उद्‌गार काढतो.

"दुःखाचा स्पर्श न होता, मानव जीवनाची अखेरी गाठेपर्यंत 'हा माणूस सुखी होता' असे विधान करण्याचे धाडस करू नये."

कारण जीवन अनाकलनीय आहे; ऱ्हस्वदृष्टी मानवाला संपूर्ण जीवनदर्शन होऊ शकत नाही.

कथानकांचा नाट्यपूर्ण विकास, चतुर व्यक्तिदर्शन यांप्रमाणे भाषाशैलीतील सौंदर्य या नाटकातही प्रतीत होते. सुटसुटीत, चटकदार, उत्कंठा सतत जागृत ठेवणारे संवाद विशेष लक्षणीय आहेत. तसेच सोफोक्लीजचा प्रसिद्ध उपरोध संवादांत व घटनांत जागोजागी आढळतो. ईडिपसची पाप्याला दण्ड देण्याची घोषणा, टायरेसिअसच्या अंधत्वाला

ईडिपसने मारलेला टोमणा, देववाणी खोटया ठरतात हे जोकास्टाचे प्रतिपादन, क्रेओनवरचा ईडिपसचा द्रोहाचा आरोप, आपली बातमी आनंदाची आहे ही कॉरिंथच्या दूताची खात्री– वगैरे उपरोधाची स्थळे नाटकातील उत्कटतेचा सतत परिपोष करीत रहातात.

असे हे बहुगुणी नाटक ॲरिस्टॉटलने आदर्श शोकनाटच ठरवले, याची यथार्थता वाचकाला मनोमन पटते.

'इलेक्ट्रा' हे नाटक 'राजा ईडिपस' नंतर व 'कोलोनसमध्ये ईडिपस' पूर्वी मध्यंतरी केव्हा तरी लिहिलेले असावे. या नाटकात सोफोक्लीजने मायसिनीच्या राजघराण्याच्या इतिहासातील एक भाग कथानक म्हणून निवडला आहे. मायसिनीचा राजा पेलॉप्स ; याचा पुत्र ॲट्रिअस. ॲट्रिअसने आपला भाऊ थीएस्टिस याला, त्याने आपल्या पत्नीला भ्रष्ट केल्याबद्दल सूड म्हणून त्याच्याच अपत्यांचे मांस खाऊ घातले. या घोर कृत्याबद्दल देवांनी ॲट्रिअसचे सारे घराणे शापून टाकले. ॲट्रिअसचा पुत्र ॲगमेम्नॉन याचा त्याची पत्नी क्लायटेम्नेस्ट्रा हिने खून केला. त्याचा सूड तिला व तिचा साथीदार व प्रियकर इजिस्थस याला ठार मारून, ॲगमेम्नॉनचा पुत्र ऑरेस्टीज व कन्या इलेक्ट्रा यांनी उगवला, या कथाभागावर इस्किलस या थोर ग्रीक शोकनाट्यकाराने आपली प्रसिद्ध त्रिपुटी लिहिली होती. त्यातले मधले नाटक 'कोईफोरी' (अर्घ्यधारिका) हे 'इलेक्ट्रा'च्या कथानकावर आहे. युरायपिडीज या ग्रीक नाटककारानेही 'इलेक्ट्रा' याच नावाने नाटक नंतर लिहिले आहे. तिन्ही नाटककारांची कथानक हाताळण्याची पद्धत अर्थात भिन्न भिन्न आहे. इस्किलस व युरायपिडीज यांनी ऑरेस्टीजला मध्यवर्ती पात्र बनविले आहे. सोफोक्लीजला मात्र इलेक्ट्रामध्ये, शोकनाटचाचा केंद्रबिंदू होऊ शकेल अशी व्यक्तिरेखा दिसली व तिला भरीव आकार देऊन व तिच्याभोवती कथानक गुंफून त्याने एक अत्यंत प्रभावी शोकान्तिका ग्रीक रंगभूमीला प्रदान केली.

नाटकाच्या कथानकात अभिज्ञान (recognition) व भाग्यचक्राचे भ्रमण (reversal) समाविष्ट करून, नाना घटनांतून नाटचपूर्णता व उत्कंठा यांचा परिपोष सोफोक्लीजने उत्कृष्टपणे साधला आहे. नाटकाच्या आरंभी पितृवध, मातेचा व्यभिचार व स्वतःला मिळत असलेली अपमानास्पद वागणूक यांमुळे दुःखाच्या गर्तेत आकंठ बुडालेली इलेक्ट्रा आपणास दिसते; पण तिचे भाग्यचक्र तिचा भाऊ ऑरेस्टीज देशांतराहून परत आल्यावर फिरण्यास सुरवात होते. ऑरेस्टीज क्लायटेम्नेस्ट्रा व तिचा जार यांचा वध करतो व मायसिनीचा राजा होतो. इलेक्ट्राची सूड घेण्याची मनीषा पूर्ण होते व राजाची लाडकी बहीण म्हणून तिला मानाचे स्थान प्राप्त होते. याच्या उलट, क्लायटेम्नेस्ट्रा व तिचा प्रियकर इजिस्थस राज्यपदाधिष्ठित, वैभवाच्या शिखरावर उभे असलेले आरंभी दिसतात; पण शेवटी त्यांच्या पापाचे घडे भरून त्यांना परलोकची वाट धरावी लागते. अभिज्ञान–गौप्यस्फोट– सत्याची प्रखर जाणीव– सुखद व दुःखद अशा दोन्ही प्रकारांनी सोफोक्लीजने ठिकठिकाणी कौशल्याने वर्णिली आहे. ऑरेस्टीज मरण पावला आहे या सुखद समजुतीत क्लायटेम्नेस्ट्रा असता, एकदम ऑरेस्टीज तिच्यासमोर उभा ठाकतो व त्या सत्याच्या प्रखर प्रकाशाने ती गर्भगळित होते. उलट ऑरेस्टीजच्या मृत्यूच्या बातमीने व्याकूळ झालेली इलेक्ट्रा त्याची भेट होताच हर्षाने नुसती फुलून उठते.

इतर नाटकांप्रमाणे या नाटकातही सोफोक्लीजचे कथानकरचनेचे चातुर्य, उत्कंठा सतत जागृत ठेवण्याची दक्षता, उपरोधाने परिणामकारिता साधण्याची हातोटी व नाटचाचा जणू प्राणच असा संघर्ष– क्लायटेम्नेस्ट्रा व इलेक्ट्रा– दुष्प्रवृत्ती व सत्प्रवृत्ती– अखंड ज्वलंत ठेवण्याचे कौशल्य प्रकट झालेले आहे.

कथानकाप्रमाणे व्यक्तिदर्शनातही सोफोक्लीजची कुशलता दिसते. सर्वांत महत्त्वाचे पात्र इलेक्ट्रा. तिच्या व्यक्तिरेखेत मिश्रित झालेले भिन्न भिन्न रंग व तिच्या मुखावाटे होणारे संमिश्र भावनांचे प्रकटीकरण केवळ अवर्णनीय आहे. ती रंगमंचावर प्रथम येते तीच शोकात बुडालेली, क्रोधाने, त्वेषाने पेटलेली. पितृवधाच्या शोकापेक्षाही तिला आईचे जारकर्म जास्त संत्रस्त करताना दिसते. तिला अशी शोकाने सुन्न झालेली, सूड घेण्याच्या कल्पनेने पेटलेली, आईच्या पापकर्मांनी जळफणारी पाहिली, की हॅम्लेटची

आठवण येते. मात्र ती हॅम्लेटप्रमाणे संभ्रमात पडून निष्क्रिय झालेली नाही. तिला अपराधी कोण हे ठाऊक आहे व त्या अपराध्यांना दंड देण्याचा तिचा दृढ निश्चय झालेला आहे. जमल्यास बहिणीच्या मदतीने, दूरस्थ भाऊ येऊन ठेपल्यास त्याचे साहाय्य घेऊन, नाही तर ती स्वतःच, एकटीच, सूड उगवण्यास सिद्ध आहे. तिच्या आईचा कठोर निर्धार तिच्यात उतरलेला दिसतो. ऑरेस्टीज मरण पावल्याची दुष्ट वार्ता ऐकताच ती कोलमडून पडते; पण भाऊ भेटताच आनंदाने डवरून जाते. त्या पुनर्मीलनाच्या क्षणी तिच्या हृदयातल्या साऱ्या कोमल, हळव्या भावना व तिचे गाढ बंधुप्रेम उफाळून येते; पण थोड्याच क्षणानंतर तिच्या हृदयातली सूडाची भावना धगधगू लागते व ऑरेस्टीजला अपराध्यांना शिक्षा देण्यासाठी ती प्रवृत्त करते. क्लायटेम्नेस्ट्रावर ऑरेस्टीज वार करतो तेव्हा ती पिसाटासारखी किंचाळते,

" हाण, हाण आणखी एकदा असेल नसेल तितका जोर लावून. "

इजिस्थसला ऑरेस्टीज मारण्यास सिद्ध होतो, तेव्हा ती म्हणते,

" मार एकदम; बोलायलासुद्धा संधी देऊ नको त्याला. ताबडतोब जीव घे त्याचा. दे फेकून त्याचं मढं; होऊ दे त्याची गत त्याला साजेल अशी. तसे झाल्याशिवाय, मला या दोघांनी जे भोगायला लावले आहे, त्याचे उट्टे नाही निघणार. "

प्रथमदर्शनी तिची व्यक्तिरेखा अनैसर्गिक व स्त्रीस्वभावाला न साजेशी वाटते. आधुनिक मनाला इलेक्ट्राचे वर्तन अशोभनीय वाटले, तरी अडीच हजार वर्षांपूर्वीच्या आदिम वृत्तीच्या प्रेक्षकांना ते वास्तवपूर्ण वाटले असेल. युरायपिडीजच्या हेकॅबीचे वर्तनही आधुनिक मनाला बोचते; पण सोफोक्लीजने इलेक्ट्राच्या स्वभावाची मृदू बाजूही दाखविली आहे. त्यावरून सोफोक्लीज असे सुचवितो, की इलेक्ट्राच्या जीवनातल्या या दुर्घटना घडण्यापूर्वी ती मृदुमधुर भावनांची युवती होती; पण जीवनाचे जे भीषण दर्शन तिला घडले त्याने तिच्या मनातील त्या मुग्ध, सात्विक भावना जळून खाक झाल्या – पण तिच्या हृदयावर भावाच्या भेटीचे अमृतसिंचन होते, तेव्हा त्या भावना क्षणभर पुनर्जीवित होतात.



अपराध्यांना शासन होऊन ऑरेस्टीजचे राज्य झाल्यावर ती पुन्हा एक निरागस, प्रेमळ तरुणी बनेल, असे सोफोक्लीज दर्शवीत आहे. इलेक्ट्रा अशी अनैसर्गिक, कठोर बनण्याचे कारण, ती अनैसर्गिक, भयानक परिस्थितीत सापडली हे होय, असे दाखवून सोफोक्लीजने आपले मनुष्यस्वभावाचे सूक्ष्म, सखोल ज्ञान प्रकट केले आहे.

पित्याची प्रेमळ कन्या व ऑरेस्टीजची प्रेमळ बहीण असे इलेक्ट्राचे चित्र रेखाटून तिच्या क्रौर्याला सोफोक्लीजने मार्दवाची झालर लावली आहे. पण क्लायट्टेम्नेस्ट्राची व्यक्तिरेखा मात्र विश्वासघात करणारी पत्नी, व्यभिचारिणी व अनैसर्गिक माता अशी काळीकुट्ट रेखाटली आहे. शोकान्तिकेच्या व नायिकेच्या चौकटीत तिचे चित्र नेटके बसते. मूळची ती कर्तबगार, महत्त्वाकांक्षी, निर्धारी स्त्री. पण ॲगमेम्नॉनने, आपल्या पतीने, आपली कन्या, इफीजीनिआ हिचा देवांना शांत करण्यासाठी बळी दिला म्हणून ती खवळली आहे. ॲगमेम्नॉनचा वध करताना फक्त सूडाची भावना तिच्या मनात असते. पण त्याच्या मृत्यूनंतर तिला सत्तेची हाव सुटते व आपल्या प्रियकराला, इजिस्थसलाही ती आपल्या सत्तेचा भागीदार करते. तिच्या मार्गात येणाऱ्या साऱ्यांना ती कापून काढण्यास तयार आहे– मग ती पोटची पोरे का असेनात. आपल्या मुलीला, इलेक्ट्राला आपली वागणूक पसंत नसल्याचे पाहून, प्रथम ती तिच्यापाशी आपले समर्थन करू पहाते; पण इलेक्ट्रा आपल्या पित्याच्याच स्मृतीशी एकनिष्ठ रहाते, तेव्हा ती इलेक्ट्राला घरातल्या एखाद्या गुलामासारखे वागवू लागते. इलेक्ट्राला मुले झाली, तर ती आपल्यावर सूड उगवतील म्हणून इलेक्ट्राच्या लग्नाचा विचारही ती मनात आणीत नाही. ऑरेस्टीज परदेशातून परत येईल व आपला काटा काढील, या धास्तीने प्रत्यक्ष मुलाचा नाश व्हावा, म्हणून ॲपोलोची प्रार्थना करण्यापर्यंत तिची मजल जाते. ऑरेस्टीजच्या मृत्यूची बातमी ऐकताच बाहेरून ती दुःखाचे ढोंग करते; पण आतून आनंदित होते. पण ऑरेस्टीज तिचा वध करण्यास उद्युक्त होतो तेव्हा मात्र निर्लज्जपणे–

" अरे, मी तुझी आई ना ! माझ्यावर दया कर "

अशी त्याची आर्जवे करण्यास तयार होते.





प्रथम बेडरपणे, सदसद्विवेकबुद्धीला गुंडाळून ठेऊन ती पतिहत्या करते; पण मग अशुभसूचक स्वप्न पडल्यावर ती घाबरून मृतात्म्याची शांती करू पहाते. आपल्या कृत्याची तरफदारी इलेक्ट्रापाशी करून ती आपल्या मनाचे– व कदाचित वाचकांचेही– समाधान करू पहाते; पण अॅपोलोची प्रार्थना करताना, ऑरेस्टीजचा नाश इच्छिताना तिला पाहून वाचकांना तिची घृणा वाटू लागते. अॅपोलो अशा बिनकाळजाच्या प्रार्थनेला प्रतिसाद देईल काय ? (अॅपॉलोने तर आधीच ऑरेस्टीजला मातृवध करण्याचा आदेश दिला आहे.)

येथे सोफोक्लीजच्या उपरोधाचा एक अत्युत्कृष्ट नमुना आहे प्रार्थनेनंतर लगेच शिक्षक ऑरेस्टीजच्या मृत्यूची बातमी घेऊन येतो. अॅपोलोने आपली प्रार्थना ऐकली असे वाटून क्लायटेम्नेस्ट्रा हुरळून जाते; पण ती बातमी म्हणजे तिच्याविरुद्ध ऑरेस्टीज व इलेक्ट्रा यांनी रचलेल्या कटाचा एक भाग असतो. तिला याप्रकारे सुरक्षिततेच्या भ्रमाखाली बेसावध राखून त्यांना तिचा घात करावयाचा असतो.

ऑरेस्टीज हा जरी क्लायटेम्नेस्ट्रा व इजिस्थस यांचा वध करण्याचे मुख्य कार्य पार पाडतो, तरी सोफोक्लीज, त्याच्या व्यक्तिदर्शनावरच फारसा जोर देत नाही. त्याच्या मते सूडाचे केवळ एक साधन म्हणून तो नाटकात वावरतो. म्हणून त्याच्या मनातील भावनांचा कल्लोळ, इलेक्ट्राप्रमाणे, सोफोक्लीज रंगवीत नाही. बहीण भेटल्याचा त्याचा आनंद तिला भावाच्या भेटीने होतो, तितका उत्कट नाही. पितृवधाचा शोक, आईच्या पापकर्माची चीड व सूडाचा अभिनिवेशही इलेक्ट्राइतका तीव्र नाही. तो काहीसा थंड, रूक्ष, भावनाहीन व केवळ व्यावहारिक वृत्तीचा वाटतो. आपला राज्यावरचा हक्क प्रस्थापित झाल्याच्या समाधानातच तो आहे. युरायपिडीजच्या किंवा इस्किलसच्या ऑरेस्टीजच्याप्रमाणे त्याला मातृवधाची खंत किंवा हातून घडलेल्या पापाच्या दण्डाबद्दल भीती नाही. ती सर्व जबाबदारी अॅपोलोवर टाकून तो निश्चिंत झाला आहे.

इस्किलसने ऑरेस्टीजला आपला नायक केल्यामुळे, त्याने, सोफोक्लीजने ईडिपसवर लिहिली, तशी शोकनाट्याची त्रिपुटी 'ऑरेस्टीआ' लिहिली व ऑरेस्टीजच्या मातृवधाच्या अपराधाचा न्याय शेवटी त्याच्या बाजूने कसा झाला ते दाखवले; पण सोफोक्लीजला इलेक्ट्रावरच लक्ष केंद्रित करावयाचे होते. त्याला इलेक्ट्राच प्रभावी, स्वयंपूर्ण कर्तृत्ववान अशी वाचकांपुढे उभी करावयाची होती.

क्रिसोथेमिस ही इलेक्ट्राची बहीण, अँटीगनीची बहीण इस्मिनी हिचे स्मरण करून देते. इस्मिनीसारखीच ही भित्री, दुबळी, अजिबात आत्मविश्वास नसलेली व प्रतिकूल परिस्थितीपुढे मान वाकवणारी आहे. तिच्या या स्वभावाच्या पार्श्वभूमीवर इलेक्ट्राचा करारी, धाडसी व दृढनिश्चयी स्वभाव उठून दिसतो.

इजिस्थस हा क्लायटेम्नेस्ट्राच्या अघोर कृत्यातील साथीदार. हा थीएस्टीसचा मुलगा. त्याला अॅट्रिअसने केलेल्या कृष्णकृत्याबद्दलचा सूड अॅगमेम्नॉनवर उगवायचा होता. त्याला राजपदाचीही हाव आहेच. पण क्लायटेम्नेस्ट्राची धडाडी त्याच्यात नाही. पोकळ बढाया मारण्यात मात्र तो हुशार आहे. ऑरेस्टीज मेल्यामुळे आता सगळेजण आपल्यापुढे नांगी टाकतील व आपण सत्ताधीश होऊ या कल्पनेने तो खुशाल आहे. आपण ऑरेस्टीजचा मृतदेह अनाच्छादित करतो आहोत, अशा सुखद कल्पनेने तो गरजतो. "उघडून टाका सारी दारे, येऊ दे लोकांना आत, म्हणजे ऑरेस्टीजचा मृत देह पाहून त्यांच्या आशांची राखरांगोळी होईल." सोफोक्लीजच्या व्याजोक्तीचे हे आणखी एक उत्कृष्ट उदाहरण आहे. कारण प्रेक्षकांना माहीत असते, की शव क्लायटेम्नेस्ट्राचे असून ते पहाताच त्याच्याच आशाआकांक्षांची राखरांगोळी होणार आहे. त्याच्या कृतकर्माचे यथायोग्य प्रायश्चित्त ऑरेस्टीज त्याला देतो. हा भ्याड माणूस ऑरेस्टीजचा काही प्रतिकारसुद्धा करीत नाही. बकऱ्यासारखा निमूटपणे त्याच्या मागे जाऊन सुऱ्याखाली मान देतो.

गायिकावृंद आरगॉसमधील मायसिनीमधील नागरिक स्त्रियांचा आहे. त्यांचे भवितव्य राजघराण्याशी निगडित असल्यामुळे कथानकाशी व इलेक्ट्राच्या व इतर पात्रांच्या सुखदुःखाशी त्या समरस झालेल्या आहेत, त्या ऑरेस्टीजला त्याच्या कटात साथ देतात; प्रारंभी कथानकाची पार्श्वभूमीही त्या

स्पष्ट करतात. गायकवृंद हा सर्वच नाटकांत नाटककारांचा प्रतिनिधी असल्यामुळे तो न्यायाच्या बाजूचा असतो व प्रेक्षकांना न्यायाची बाजू घेण्यास प्रवृत्त करीत असतो. या नाटकातला नारीवृंद इलेक्ट्राबद्दल सहानुभूती दाखवतो. परमेश्वरी न्याय खुनी पाप्यांचा समाचार घेईल; सूडदेवता गुन्हेगारांचा पाठपुरावा करतील, याबद्दल त्या वारंवार ग्वाही देतात. सोफोक्लीजने आपले जीवनविषयक तत्त्वज्ञान वृंदाच्या तोंडी मधूनमधून घातले आहे ; मात्र सोफोक्लीजच्या इतर नाटकांइतका 'इलेक्ट्रा'तील वृंद क्रियाशील किंवा प्रखर नाही. वृंद फक्त आपली सहानुभूती दाखवतो. भावगंभीर, सखोल तत्त्वचिंतनात्मक प्रतिभाविलासाने परिपूर्ण अशी वृंदगीतेही या नाटकात नाहीत.

'इलेक्ट्रा' तही ग्रीक देव रंगमंचावर अवतरत नाहीत. ते फक्त घटनांची पूर्वसूचना देतात. अॅपोलो ऑरेस्टीजला काय करायचे ते सुचवतो ; पण ते प्रत्यक्ष अमलात आणतो ऑरेस्टीजच. क्लायटम्नेस्ट्रा, इजिस्थस यांची शोकांतिका होते ती त्यांच्या स्वतःच्या कर्मांनीच. 'इलेक्ट्राबद्दल करुणा व अपराध्यांना देहदंड झाल्यावरची कातरता यांनी शोकनाट्याचे शेवटी जीवनाचा पाप्यांनी ढवळलेला समतोल पुन्हा प्रस्थापित होतो. सुव्यवस्था, न्याय यांची प्रस्थापना झाल्यावर प्रक्षुब्ध भावना समधात होतात. नाटकाच्या आरंभीची प्रसन्न पहाट, मध्यान्हींच्या भीषण न्यायनिवाड्यानंतर, शांत, समाधानी संध्येत परिणत होते व जीवनाचे वर्तुळ पूर्ण होते.

नाटकांत गंभीर वृंदगीते नसली, देव रंगमंचावर अवतरत नसले, तरी देवांना उद्देशून केलेल्या भावपूर्ण, गंभीर प्रार्थना ठिकठिकाणी आहेत व त्यांचे कथानकाच्या विकासात महत्त्वाचे स्थान आहे, कारण प्रत्येक प्रार्थनेत पुढे काय होणार याची सूचना असते व प्रार्थनांनंतर अन्वर्थक अशा घटना प्रत्येक वेळी घडतात.

पहिली प्रार्थना ऑरेस्टीजची आहे. अनेक वर्षांनी जन्मभूमीत पाय ठेवल्याबरोबर तो कुलदैवतांची व ग्रामदेवतांची प्रथम प्रार्थना करतो. त्याचे गृह पापांनी दूषित झाले आहे ते त्याला कळले आहे. त्याच्या शुद्धीकरणासाठी व आपला हरपलेला हक्काचा वारसा मिळण्यासाठी तो त्यांच्या साहाय्याची याचना करतो. या प्रार्थनेत पूर्वी काय घडले याची वाचकांना कल्पना येते व पुढे काय घडणार आहे याची पूर्वसूचना मिळते.

दुसरी प्रार्थना इलेक्ट्राची. ती अधोलोकीच्या देवांना साहाय्यासाठी साद घालते; कारण ग्रामदेवता व कुलदेवता यांनी तिच्या घराण्याच्या अरिष्टाचे निवारण केले नाही. काहीसा संतप्त, बंडखोर सूर या प्रार्थनेत उमटतो. आपल्या निर्वासित भावाला स्वगृही परत आणण्यासाठी व उभयतांच्या कार्यसिद्धीस यश देण्यास ती विनवते. या प्रार्थनेला प्रतिसाद मिळणार – कारण ऑरेस्टीज आलेलाच आहे– व दोघांचे घराण्याच्या शुद्धीकरणाचे ईप्सित पुरे होणार, असा दिलासा वाचकांना मिळतो.

तिसरी क्लायटेम्नेस्ट्राची पापी प्रार्थना. तिच्याबद्दल घृणा उत्पन्न करणारी ही प्रार्थना आहे हे पूर्वी पाहिलेच. तिच्या प्रार्थनेला मिळालेल्या प्रतिसादातील उपरोध अत्यंत नाट्यपूर्ण व रंजक आहे. कुटिल प्रार्थनेला अॅपोलोचे फसवे उत्तर यथायोग्यच आहे.

चौथी प्रार्थना इलेक्ट्रा अॅपोलोची करते. ज्या ठिकाणी क्लायटेम्नेस्ट्रा आपली दुष्प्रवृत्त प्रार्थना करते, तिथेच इलेक्ट्राची ही सत्प्रवृत्त प्रार्थना. तिला सुखद उत्तर ऑरेस्टीजच्या मातृवधाने तात्काळ मिळते.

'कोलोनसमध्ये ईडिपस' हे शेवटचे श्रेष्ठ नाटक. सोफोक्लीजच्या मृत्यूनंतर (इ. स. पू.४०६) ते रंगमंचावर सादर करण्यात आले. वृद्ध राजा ईडिपस याच्या अखेरच्या क्षणांचे चित्रण या नाट्यात आहे. सोफोक्लीजही या सुमारास जवळजवळ नव्वद वर्षांचा झाला होता. त्यामुळे हे त्याच्याच अखेरच्या धन्य, कृतार्थ जीवनाचे रेखाटन आहे की काय, असे वाटते. तत्कालीन प्रेक्षकांनाही नुकत्याच मृत पावलेल्या सोफोक्लीजची आठवण, ईडिपसला पहाताना होत असेल व त्यांचे हृदय भारावून जात असेल.

नाटकाचे शीर्षकही सोफोक्लीजच्या अंतःकरणातील कोमल भावनांवर प्रकाशझोत टाकणारे आहे. 'ईडिपसची अखेर' असे नाव नाटकाला देता आले असते. पण कोलोनस या स्थळाबद्दल सोफोक्लीजच्या मनात अत्यंत जवळीकीच्या अशा मृदुमधुर भावना होत्या. कोलोनस ही त्याची जन्मभूमी होती. ती त्याच्या मते अंतर्बाह्य सुभगसुंदर होती, म्हणून त्याने

अनुक्रमणिका

ईडिपसला त्याच्या दिव्य निर्वाणासाठी तेथे पाठवले आहे. कोलोनसचे अत्यंत काव्यपूर्ण, भावनासुंदर, वर्णन त्याने गायकवृंदाच्या तोंडी घातले आहे. बुद्धिभ्रंश झाल्याच्या आरोपातून न्यायाधीशाने सोफोक्लीजची सुटका केली ती या स्तुतिस्तोत्राच्या आरंभीच्या नितांतरमणीय ओळी ऐकूनच.

राजा ईडिपस निर्वासित होऊन राज्याबाहेर पडला. त्यानंतर वीस वर्षांनी तो 'कोलोनसमध्ये ईडिपस' या नाटकात नजरेसमोर येतो. वीस वर्षे तो वणवण भटकला आहे; त्याच्या कपड्यांच्या चिंध्या झाल्या आहेत. त्याची कन्या अँटीगनी त्या दीन आंधळ्याची सतत काठी बनून राहिली आहे. आपला मृत्युदिन जवळ आला आहे असे त्याला वाटत आहे व कोलोनसला देह ठेवण्याची त्याची इच्छा आहे. दरम्यान डेल्फीला देवाने कौल दिला आहे की ईडिपसवरील कलंक धुवून गेला असून आता त्याचा पवित्र देह ज्या भूमीत अखेरची विश्रांती घेईल, त्या भूमीचे भाग्य सतत उज्ज्वल राहणार आहे. ही बातमी कळताच क्रेओन थीब्सहून व पॉलिनायसिस ईडिपसच्याहून त्याला आपल्या राज्यात घेऊनजाण्यासाठी येतात. पण आपल्या पडत्या काळात त्या दोघांनी त्याला ठोकरले असल्यामुळे ईडिपस अत्यंत कठोर शब्दांत त्यांचा निषेध करून, त्यांच्याकडे जाण्याचे नाकारतो. तो अथेन्सचा राजा थीसिअस याला बोलावून घेतो. नंतर ईडिपसला कसे दिव्य, अद्भुत मरण येते ते दूताच्या तोंडून वर्णन केले आहे.

मूळ कथा ईडिपस कोलोनस येथे मृत्यू पावला, एवढीच आहे. पण सोफोक्लीजने आपल्या प्रतिभेने व कल्पकतेने एक अत्यंत प्रभावी नाटक त्याच्यावर रचले आहे. डेल्फीचा कौल ही सोफोक्लीजचीच कल्पना आहे.

नाटकाचा प्रारंभ संथपणे होतो. ईडिपस चाचपडत अँटीगनीबरोबर रंगमंचावर येतो; पण लगेच झपाट्याने कथानकाला वेग येतो. कोलोनसचे श्रेष्ठी कोलोनसच्या पवित्र कुंजात ईडिपसला जाण्यास मनाई करतात. संघर्षाने उत्कंठा वाढत जाते. नंतर क्रेओन मुलींना व ईडिपसला जबरदस्तीने थीब्सला नेऊ लागतो तेव्हा श्रेष्ठी ईडिपसची बाजू घेतात. मग ईडिपसचा मुलगा पॉलीनायसिस याच्याशी ईडिपसचा संघर्ष होतो. वाचकांची उत्कंठा व घटनांतले नाट्य वाढत जाते. ईडिपस तीव्र उत्कंठेने थीसिअसच्या आगमनाची वाट पहातो. थीसिअसच्या आश्रयाच्या आश्वासनाने उत्कंठेचा ताण सैल होतो. ईडिपसच्या शेवटच्या निर्णयाने वाचक स्तिमित होतो, व ईडिपसच्या पुण्यान्ताने त्याला आल्हाद होतो.

कथानकातील भाग्यचक्राची गती 'राजा ईडिपस'-च्या नेमकी उलटी आहे. तेथे सत्ताधीशाचा भणंग-भिकारी होतो, तर इथे दीनदुबळा एकदम महामानव ठरतो. उलट गुर्मीत असलेल्या क्रेओनला पकडून नेलेल्या मुली थीसिअसच्या पुढे पराभव पावून, परत द्याव्या लागतात, व थीब्सला पळून जावे लागते. ईडिपसच्या दिव्य मरणाने त्याच्या निष्कलंकत्वाची जाणीव होते. recognition व कथानक सर्वांशाने परिपूर्ण होते.

'राजा ईडिपस' प्रमाणेच या नाटकातही ईडिपसचे व्यक्तिमत्त्व आरंभापासून शेवटपर्यंत उत्कटतेने प्रतीत होते. पण कोलोनसमधल्या ईडिपसच्या व्यक्तिमत्त्वात नाना रंगांच्या छटा आहेत व त्या सोफोक्लीजने अत्यंत कौशल्याने, मनुष्यस्वभावाच्या आपल्या सखोल व सूक्ष्मदर्शी ज्ञानाच्या साहाय्याने रेखाटल्या आहेत. नाटकाच्या आरंभीचा ईडिपस, 'राजा ईडिपस'मध्ये शेवटी दिसतो, तसा हताश, व्यथित व आता वीस वर्षांच्या भटकंतीनंतर थकलेला, दीनदुबळा असा आहे. मनाने व शरीराने असा तो चाचपडत वावरतो आहे. मुलीचा आधार क्षणोक्षणी शोधतो आहे. निवाऱ्याची गरज व आशा यांनी तो व्याकूळ झाला आहे. श्रेष्ठी वृंदाच्या जबरेखाली तो मान वाकवतो आहे पण या बाह्य दीनतेमागे, काहीतरी सामर्थ्य, सुप्त असलेले, हळूहळ जागृत होत असलेले मधूनमधून भासते. एकीकडे "मी कलंकित आहे; दूर रहा माझ्यापासून" असे तो म्हणतो, "माझा संसर्ग तुम्हाला बाधणार नाही; तो कर्मभोग मीच तेवढा भोगतो आहे." असे नरमाईने म्हणतो. पण श्रेष्ठीवृंदाने त्याच्या पापाबद्दल जुगुप्सा दर्शविताच तो एकदम आवेशाने स्वतःचे समर्थन करू लागतो,

"मी पाप केले असे कुणाला म्हणता येणार नाही. पण माझ्यावर लादले गेले." पित्याच्या वधाबद्दलही तो म्हणतो,

अनुक्रमणिका

"तुम्हाला कुणी छेडायला लागला, मारायला धावला, तर त्याचा ताबडतोब प्रतिकार न करता, तो तुमचा कुणी बाप वगैरे लागतो की काय, याचा का तुम्ही विचार करीत बसाल ?" क्रेओनचा, पॉलीनायसिसचा धिक्कार करताना त्याचा तापट, अभिमानी स्वभाव प्रक्षुब्ध होऊन उठतो. अँटीगनीशी, इस्मिनीशी बोलताना, त्यांना थीसिअसने सोडवून आणल्यानंतर त्यांना हृदयाशी कवळताना त्याची वत्सलता प्रकट होते. थीसिअसशी तो अत्यंत सौहार्दाने वागतो. निर्वाणाचा क्षण समीप येताच तो शांत, स्थिरचित्त होतो. त्याच्या चेहऱ्याभोवती जणू तेजोवलय झळकू लागते. त्याचा आत्मविश्वास परत येतो.

"मी एक पवित्र, पुण्यात्मा म्हणून तुमच्याकडे आलो आहे. माझ्या सान्निध्याने तुमच्या राज्याचे भाग्य उजळणार आहे." असे तो बजावतो– मधली वीस वर्षे जणू पुसून जातात– तो ताठ, डोळसपणे, समाधिस्थलाकडे चालू लागतो.

ईडिपसचा हा कायाकल्प सोफोक्लीजने रंगवला आहे. रंगमंचावर ही प्रभावी व्यक्तिरेखा उभी करणे हे अभिनयपटू नटाला एक आव्हानच ठरावे.

या नाटकातला क्रेओन 'राजा ईडिपस' मधल्यापेक्षा निराळा आहे. या वीस वर्षांत तो सत्तामदांध झाला आहे. अँटीगनीशी नंतर त्याचे झालेले वर्तन असेच अतिरेकी व उद्दाम आहे. ईडिपसशी बोलताना प्रथम तो जो साळसूदपणाचा ढोंगी आव आणतो तो ईडिपसच्या स्पष्टवक्तेपणापुढे घृणास्पद वाटतो. ईडिपसचे मन वळवण्यात अपयश आल्यावर क्रेओनचे जुलमी रूप प्रकट होते, स्वार्थापुढे त्याला न्याय–अन्यायाची चाड नाही. असहाय मुलींना जबरदस्तीने तो पकडून नेतो. शेवटी थीसिअसपुढे तो नांगी टाकतो व पोकळ धमक्या देत पळ काढतो.

पॉलीनायसिसचा ढोंगीपणा क्रेओनहूनही जास्त घृणास्पद आहे. त्याने स्वतःच्या दुबळ्या अंध पित्याला राज्याबाहेर काढले होते. मदतीचा हात पुढे करण्याचे नाकारले होते. त्याबद्दलचे प्रायश्चित्त म्हणूनच की काय त्याचा धाकटा भाऊ इटिओक्लीज याने त्याला थीब्जबाहेर पिटाळून थीब्सचे राज्य बळकावले. पॉलीनायसिस ऑर्गॉसला आश्रयाला गेला, तेथे राजघराण्याशी संबंध जोडून, आणखी सहाजणांची मदत घेऊन थीब्सवर चढाई करायचा त्याचा बेत आहे. ईडिपसचे सान्निध्य म्हणजे यशाची खात्री, अशा देवांच्या कौलामुळे आता तो पित्याला आपल्याकडे न्यायला आला आहे. बापाच्या अवदशेबद्दल खोटा गहिवर काढतो आहे व थीसिअसची व श्रेष्ठीवृंदाची सहानुभूती मिळवण्याचा प्रयत्न करतो आहे; पण ईडिपस या ढोंगीपणाने चिडून त्याची खरडपट्टी काढतो. त्याची थीब्सवरची स्वारी कधी यशस्वी होणार नाही व दोघे भाऊ एकमेकांच्या हातानेच मृत्युमुखी पडतील असा घोर शाप तो उच्चारतो. निरुपाय होऊन, आपण भूत झाल्यावर आपला अंत्यसंस्कार करण्याविषयीची विनंती अँटीगनीला करून तो जायला निघतो. त्याच्या काळ्याकुट्ट व्यक्तिमत्त्वातील एकुलती एक प्रकाशाची तिरीप म्हणजे जाण्यापूर्वी तो आपल्या दोघी बहिणींना, त्या निष्पाप आहेत हे ओळखून शुभेच्छा देतो. अँटीगनी व इस्मिनी या दोन्ही मुली प्रेमळ, निष्ठावंत आहेत. सोफोक्लीजला अशा कोमल, मायाळू, एकनिष्ठवृत्तीचे– विशेषतः स्त्रियांमधील– आकर्षण होते. अँटीगनी पित्याबरोबर सतत वीस वर्षे राहिली आहे. इस्मिनी मधूनमधून त्याला भेटायला येते व महत्त्वाच्या बातम्या त्याला देते. अँटीगनीचे व्यक्तिचित्र जास्त ठळक आहे. पितृप्रेमाबरोबर तिचे बंधुप्रेमही चित्रित केलेले आहे. पॉलीनायसीसला ती थीब्सवरच्या स्वारीपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करते; पण पॉलीनायसिस तिचे ऐकत नाही. त्याची, आपला अंत्यसंस्कार यथाविधी करण्याची विनंती पुढे अँटीगनीने आपल्या प्राणाचे मोल देऊन पाळली. भावांच्या अप्पलपोटेपणाच्या व पित्याबद्दलच्या कृतघ्न बेफिकिरीच्या पार्श्वभूमीवर मुलींची निःस्वार्थ पितृसेवा करण्याची उदात्त वृत्ती उठून दिसते.

अथेन्सचा राजा थीसिअस उदात्त, धीरगंभीर व दिलदार आहे. ईडिपसचा कलंक त्याला भयप्रद वाटत नाही. अत्यंत संयमित, समतोल वृत्ती त्याच्या ठिकाणी दिसते. क्रेओनच्या जुलमीपणाला तो शूरपणे पायबंद घालतो. आपल्या निर्वाणाच्या अखेरच्या क्षणाचा साक्षी व्हायला फक्त उदात्त थीसीअसलाच ईडिपस परवानगी देतो. ईडिपससाठी शोक करणाऱ्या मुलींचे तो सांत्वन करतो व त्यांच्या इच्छेप्रमाणे

अनुक्रमणिका

त्यांना थीब्सला पोचवण्याची व्यवस्था करतो. ग्रीकांच्या मते महान् असलेल्या अथेन्स नगरीच्या उदारमनस्क थोर राजाचे हे चित्रण तत्कालीन ग्रीक प्रेक्षकांना अत्यंत रोचक वाटले असले पाहिजे.

दूताचे काम अगदी अखेरीस व थोडे आहे, पण ते फारच महत्त्वाचे आहे. कारण ज्या अद्भुत, दैवी वातावरणात ईडिपसचा मृत्यू झाला, त्याचे यथातथ्य, चित्त थरारून टाकणारे वर्णन दूत करतो. मेघांचा गडगडाट, "ईडिपस, ईडिपस – आता उशीर झाला." ही अदृश्य शक्तीं-कडून आलेली साद, थीसीअसचे डोळे दिपवून टाकणारा ईडिपसचा कैवल्याला कवटाळणारा अखेरचा क्षण – हे वर्णन सारे वातावरण वाचकाच्या दृष्टीसमोर उभे करून त्याला रोमांचित करते.

श्रेष्ठीवृंद हा वृद्ध, प्रतिष्ठित नागरिकांचा असून एकंदर वातावरणाला साजेसा असाच आहे. वृंद कथानकाशी व पात्रांशी समरस झालेला असून, नाटकातील एखाद्या पात्राप्रमाणे तो घटनांत भाग घेतो. आरंभी ईडिपसला पवित्र कुंजात शिरायला वृंदसदस्य मनाई करतात. नंतर डेल्फीच्या कौलाची हकीकत समजल्यावर ते त्याच्याबद्दल सहानुभूती दाखवतात. क्रेओन ईडिपसवर जबरदस्ती करू लागतो तेव्हा ते मदतीसाठी हाका घालतात. क्रेओनचा व पोलीनायसीसचा ते त्यांच्या वागणुकी-बद्दल निषेध करतात. ईडिपसच्या मृत्यूनंतर मुलींचे सांत्वन करतात. ईडिपसच्या पुण्यान्ताने भारावून जातात.

वृंदाची गीते कथनात्मक, वर्णनात्मक व तत्त्व-चिंतनात्मक आहेत. थीसिअसने मुलींना क्रेओनपासून सोडवण्याकरता केलेल्या लढ्याचे वर्णन करताना ते आपल्या राजाची व आपल्या भूमीची प्रशंसा करतात. त्यांचे कोलोनसच्या माहात्म्याचे गीत तर प्रसिद्धच आहे. वृंदाची देवांवरील श्रद्धाही ठिक-ठिकाणी गीतात प्रतिबिंबित झाली आहे. सोफो-क्लीजने आपले तत्त्वज्ञानही काही ठिकाणी त्यांच्या तोडून वदवले आहे. काही ठिकाणी ते नैराश्याचे उद्गार काढतात.

"जन्मासच न येणे ही पृथ्वीवरची सर्वोत्तम गोष्ट आहे."

"अंतिम क्षणापर्यंत कोणाही मानवाचे जीवन सुखी झाले असे म्हणू नये."

परंतु नाटकाचा अंतिम परिणाम नैराश्याचा नाही. राजा ईडिपसचा दिव्य मृत्यू मानवाची थोरवी स्पष्ट करतो. ईडिपसने कर्मभोग भोगून, आत्मशुद्धी करून घेतली आहे. देवांनी ते ओळखून त्याच्या पावित्र्याबद्दल कौल दिला आहे. विनाशाच्या कितीही खोल गर्तेत कोसळला, तरी त्यातून स्वतःचा उद्धार करण्याचे सामर्थ्य त्याच्यात आहे, हेच शाश्वत सत्य सोफोक्लीजने ईडिपसच्या जीवनात आपल्या दिव्य दृष्टीने पाहिले व ते एका अत्यंत थोर शोका-त्मिकेत ग्रथित केले.

सोफोक्लीजचे हे अखेरचे नाटक. सोफोक्लीजचा प्रतिभाविलास, मनोवगाहन शक्ती, नाट्यतंत्रावरची पकड व भाषासौंदर्य यांचा कस, वार्धक्यातही उतर-लेला नाही. उलट त्याच्या या सर्व गुणांना जास्तच परिपक्वता आल्याचे प्रतीत होते. खऱ्या प्रतिभाशाली कलावंताची प्रज्ञा अशीच अखेरपर्यंत अधिकाधिक परिणत होत जाते. ईडिपसप्रमाणे सोफोक्लीजची ही प्रतिभा या नाटकात अतिमानवी वातावरणात उड्डाण करून दिव्यत्व पावत आहे असे वाटते.

अनुक्रमणिका

अनिल जोशी

# वाई प्राज्ञपाठशाळेचा सरस्वत्युत्सव

महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक, धार्मिक इतिहासात ज्या प्रमुख शहरांचा उल्लेख करण्यात येतो त्यात वाई शहराचे नाव प्रामुख्याने घेतले जाते. कृष्णा नदीच्या काठावर वसलेल्या या शहराची विद्येच्या क्षेत्रातली परंपरा फारच मोठी आहे. गेली सुमारे ४ शतके या ज्ञानगंगेचा ओघ सातत्याने वाई शहरातून वहातो आहे. एका अर्थानें वाई हे ठिकाण छोटेसे ज्ञानपीठच आहे असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. कृष्णेच्या काठी वसलेल्या या छोटयाश्या गावातून जशा राजकीय चळवळींच्या ठिणग्या बाहेर पडल्या तशा कर्मठ विचारातून समाजाला बाहेर काढण्यासाठी आवश्यक असणाऱ्या पुरोगामी विचार-सरणीचा प्रवाहपण वाईतून फार वेगाने वाहू लागला. विद्या, राजकारण आणि समाजकारण ह्या तिन्ही गोष्टींशी संबंधित राहून जागतिक ज्ञानदानाची कवाडे उघडण्याचे श्रेय येथील प्राज्ञपाठशाळेस आहे. ब्रह्मीभूत स्वामी केवलानंद सरस्वती यांनी घालून दिलेल्या आचारविचारांच्या बैठकीला प्राज्ञपाठशाळेने जतन केलेले आहे. ग्रंथांचे लिखाण व विचारांचे आदान–प्रदान करण्यात वाई प्राज्ञपाठशाळेने निर्माण केलेली परंपरा केवळ सामाजिक दृष्टया महत्वाची आहे असे नव्हे तर महाराष्ट्राच्या किंबहुना देशाच्या कानाकोपऱ्यातही येथील वैचारिक क्रांतीचे ठसे उमटलेले आहेत.

गेली सुमारे पस्तीसहून अधिक वर्षे तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी या प्राज्ञपाठशाळेच्या अंगीकृत कार्यास आधुनिक विचारसरणीचा पाया घालण्याचे कार्य केले आहे. पाठशाळेच्या दैनंदिन कामाव्यतिरिक्त सामान्य माणसालाही उपयुक्त ठरावा असा सरस्वत्युत्सवाचा उपक्रम, एक वेगळीच परंपरा निर्माण करून गेला आहे. माणसाच्या बुद्धमत्तेचा सर्वांगीण विकास होणे अगत्याचे आहे. हे प्रमुख सूत्र समोर ठेवून पाठशाळेने सुरू केलेला हा सरस्वत्युत्सव अनेक नामवंत विद्वानांचे व्यासपीठ बनून राहिला आहे.

साहित्य, राजकारण, समाजकारण, विज्ञान या विविध विषयातील नामवंत व्यक्तींनी आपल्या विचारांना येथे मुक्तपणे संचार करू दिले आहे. १९१६ साली सुरू झालेल्या या सरस्वत्युत्सवास आता ६२ वर्षे पूर्ण झाली. प्रतिवर्षी आयोजित करण्यात येणारी तीन व्याख्याने ही वाईकरांना बरेच काही सांगून जातात. या व्यासपीठावरून ज्यांनी आपले विचार मांडले त्यात नामवंत साहित्यिक होते, राज-कीय पक्षनेते होते, सामाजिक क्षेत्रातील धुरंधर व्यक्ती होत्या, गणिती होते. अर्थशास्त्रज्ञ होते आणि कलाकार पण होते. या विविध क्षेत्रातील ज्या ख्यातनाम वक्त्यांनी या सरस्वत्युत्सवातील पुष्पे गुंफली त्यामध्ये मुख्यत्वे.

कै. दत्तोपंत आपटे, पां. वा. काणे, ह. रा. दिवेकर, अनंत कृष्ण शास्त्री, गुरुदेव रानडे, शि. म. परांजपे, श्री. नी. चाफेकर, डॉ. नारायणराव सावरकर, विष्णुशास्त्री बापट, पंडित सातवळेकर, डॉ. श्री. व्यं. केतकर, ज. स. करंदीकर, प्रा. न. र. फाटक, डॉ. इरावती कर्वे, डॉ. पटवर्धन (माधव ज्युलियन), आचार्य प्र. के. अत्रे, ना. गो. चाफेकर, शंकरराव देव, विनोबा भावे, डॉ. पांगारकर, वा. म. जोशी, म. म. जोशी, श्री. म. माटे. आहिताग्नि राजवाडे, वि. द. घाटे, द. वा. पोतदार, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, वा. ल. कुलकर्णी, सुलभा पाणंदीकर, चिं. वि. जोशी, बॅ. जयकर, वा. सी. बेंद्रे, ह. रा. महाजनी, गोवर्धन पारीख, नानासाहेब परुळेकर, बॅ. नाथ पै, भाई डांगे, के. नारायण काळे, अनंत काणेकर, वि.

अनुक्रमणिका

म. तारकुंडे, रा. श्री. जोग, ग. त्र्यं. देशपांडे, दुर्गा भागवत, श्री. शं. नवरे, डॉ. रा. शं. वाळिंबे, गं. बा. सरदार, सेतुमाधवराव पगडी, बाळाचार्य खुपरेकर, पां. वा. गाडगीळ, बापूराव नाईक, जयवंतराव टिळक, खासदार अनंतराव पाटील, मो. ज्ञा. शहाणे, पु. शि. रेगे, मधु दंडवते, डॉ. ना. गो. कालेलकर, डॉ. इंदुमती पारीख, वा. वि. मिराशी, सौ. अनुताई लिमये, पु. ल. देशपांडे, बाबा आढाव, सत्यरंजन साठे, ग. प्र. प्रधान, देवदत्त दाभोळकर, प्रा. अ. भि. शहा, प्रा. मे. पुं. रेगे, कवि अनिल, भालबा केळकर, प्रा. नलिनी पंडित, प्राचार्य बाळ गाडगीळ, बाळ ज. पंडित, अ. का. प्रियोळकर, गो. म. जोशी, मामासाहेब देवगिरीकर, दाजी भाटवडेकर आदींचा समावेश आहे.

प्राज्ञपाठशाळेच्या या सरस्वत्युत्सवातील व्याख्यानमालेत चर्चिले जाणारे विषय व त्यावरील प्रभुत्व संपादन केलेल्या व्यक्ती यांची सुरेख सांगड घालण्यात येत असते. साहित्यक्षेत्रातील अधिकारी व्यक्तींनी मांडलेले विचार अनेकांना नवीन दृष्टिकोन देणारे ठरतात तर राजकीय विषयासंबंधीचे तज्ज्ञांचे विचार अनेकांना अंतर्मुख बनवितात. सामाजिक प्रगतीच्या आड येणाऱ्या विचारांची ज्यावेळी येथील व्याख्यानातून मांडणी करण्यात येते, त्यावेळी श्रोते अनेकवेळा स्वतःच्या दृष्टिकोनास तपासून पाहू लागतात; आणि म्हणूनच ही व्याख्यानमाला म्हणजे अनुभव समृद्धीस आवश्यक असणारे मार्गदर्शन करणारी ठरते.

## डॉ. भालचंद्र फडके

प्राज्ञपाठशाळेच्या या व्याख्यानमालेच्या संयोजकांनी यंदाच्या सरस्वत्युत्सवातील व्याख्यात्यांच्या वैचारिक दर्शनाने अनेकांना विविध बाबतीत जागृत केले आहे.

पुणे विद्यापीठातील मराठी विषय विभाग प्रमुख व मराठी वाङ्मयातील एक ख्यातनाम समीक्षक डॉ. भालचंद्र फडके यांनी आपल्या सखोल व चिंतनपर वाचनाच्या आधारे व्यक्त केलेले मराठी कादंबरीविषयीचे विचार फारच खळबळजनक वाटले. कादंबरीवाचक व कादंबरीलेखक या दोघानापण अनेक वैचारिक स्वरूपाचे धक्के डॉ. फडके यांच्या व्याख्यानातून बसण्याची शक्यता आहे. त्यांनी स्वातंत्र्योत्तर काळातील कादंबरीविषयी जो निराशेचा सूर व्यक्त केला त्यातून बरेच काही घेण्यासारखे होते. अनेक दोषांवर डॉ. फडके यांनी मार्मिकतेने बोट ठेवले. त्यांच्या भाषणातील मराठी कादंबरी–विश्वाविषयीचे विचार कादंबरीकारांना धक्के देणारे होते, ते म्हणाले "मराठी कादंबरीचे विश्व हे नवीन मूल्यांवर आधारलेले असले पाहिजे तसे घडल्यास या मराठी कादंबरीस काही महत्व प्राप्त होऊ शकेल. अन्यथा मराठी कादंबरीची मृत्युघंटा वाजण्यास फारसा विलंब लागणार नाही.

स्वातंत्र्योत्तर मराठी कादंबरीतून ज्या प्रकारचे जीवन रेखाटण्यात आले आहे व ते जीवन रेखाटणाऱ्या महिला कादंबरीकार हा डॉ. फडके यांच्या मते एक चिंतेचा विषय आहे. सध्याच्याच गतीने ही वाटचाल करू लागली तर तिचा मृत्यू फारच लवकर ओढवेल अशी टीका करून ते म्हणाले, या कादंबरीचे लिखाण करणारा लेखक मध्यम वर्गातलाच असल्याने ही कादंबरी अद्याप त्याच ठराविक विश्वात अडकून पडलेली आहे. अलिकडे कादंबऱ्या लिखाणाचे काम करण्यात महिलांची संख्या वाढत असून त्यांचे लिखाण म्हणजे केवळ मौजेखातर केलेले लिखाण आहे. त्यांचे लिखाण न अनुभवलेल्या अनुभवांचे लिखाण आहे, जीवन जगणारा वेगळा आणि त्या जीवनाविषयी लिहिणारा वेगळा अशी ही स्थिती आहे. जो लिहितो आहे त्याने ते जीवन जगलेले नाही.

स्त्रीला देह असू शकतो, तिला मन असते ही गोष्ट अद्यापही मान्य न करताच तिच्याविषयीचे लिखाण करण्याची परंपरा महिला कादंबरीकारांनी सुरू ठेवलेली आहे. केवळ सनसनाटी प्रसंगाचे लिखाण कसे करता येईल यावरच या महिला कादंबरीकारांनी आपले लिखाण केंद्रित केलेले आहे. आणि म्हणून हा एक चिंतेचा विषय ठरला आहे. ज्या मध्यम वर्गीय जीवनाचे चित्रण या स्त्री-कादंबरीकारांनी केलेले आहे ते खरे जीवन आहे का? उत्तर नकारात्मक द्यावे लागते. उच्च मध्यमवर्गीयांचे पण काही प्रश्न असू शकतात. याचे आकलन या लेखकांना झालेले नाही. त्यांना आपल्या भोवतालचे खरे जीवन कळलेलेच नाही. या भोवतालच्या जीवनाविषयी स्त्रीलेखिका इतक्या उदासीन का आहेत हे उलगडत नाही. नव्याने लिखाण करू पाहणाऱ्या या स्त्रीलेखिकांचे अनुभवविश्व फारच संकुचित आहे.

मराठी साहित्य व विशेषत्वाने मराठी कादंबरी केवळ ब्राह्मणी संस्कृतीतच अडकून पडलेली आहे. अशी टीका करताना डॉ. फडके म्हणाले, ही कादंबरी नव्याने निर्माण होणारी आव्हाने स्वीकारू शकत नाही. जोपर्यंत मराठी कादंबरीकारांजवळ जाज्वल्य मनोवृत्ती निर्माण होत नाही तोपर्यंत ही कादंबरी योग्य दिशेने वाटचाल करू शकणार नाही. स्वातंत्र्यानंतर झोपडपट्टीचे चित्रण कादंबरीतून होऊ लागले पण ते वास्तवाशी सुसंगत आहे का याचा विचार होऊ शकला नाही. ठराविक ठोकताळे व विशिष्ट समस्या मनाशी उभ्या करून केलेले हे लिखाण खोलवर रुजू शकत नाही. या झोपडपट्टीच्या आधारे जितके कामक्षुधेचे लिखाण करण्यात आलेले आहे तितके अन्नक्षुधेचे लिखाण झालेले नाही. झोपडपट्टीतील लोकांना भूक असते हे लेखकांना माहित नाही. केवळ चुकीचे सिद्धान्त स्वीकारून लिखाण करण्याचा आणखी एक प्रकार पुढे येऊ लागला आहे. शरीरविक्रयाचे लिखाण करणे म्हणजे वास्तवाचे लिखाण हा चुकीचा समज आहे. कादंबरीकाराचे खरे सामर्थ्य यातच आहे की त्याची म्हणून एक भूमिका असावी लागते. केवळ नियती आणि माणूस यांचा संघर्ष दाखवून भागत नाही.

केवळ एखाद्याचे विश्व उध्वस्त होऊन भागत नाही तर ते भावविश्व उध्वस्त झालेल्या समाज-अवस्थांच्या रोगाचे निदान कादंबरीकारास करावे लागते. स्वतःच्याच कोशात गुंतून पडणारे कादंबरीकार अधिक निर्माण झालेले आहेत. ज्ञानेश्वर-रामदास या लोकांचे भांडवल करून चरित्रात्मक कादंबरीचे लिखाण करणे हा एक नवीन प्रकार उदयास आला आहे. पण ह्या महान् व्यक्तिमत्त्वांची ओळख या लेखकांना कधीच झाली नाही. माणसातील देवत्व किंवा पशुत्व रेखाटणे एवढेच तंत्र अनेकांनी आपल्या डोळ्यापुढे ठेवले आहे. पण माणसातील मनुष्यत्व पहाण्याची दृष्टी कोणीच पुढे ठेवलेली नाही. ह्या लेखकांना गतीची जाणीव नाही. जे लिहिले गेले ते केवळ स्थितीचे लिखाण आहे. थिजून गेलेल्या जीवनाचे लिखाण करण्याचे प्रयत्न झालेले आहेत. अशा स्थितीतून गती पकडता आली तरच अधिक आशावादी राहणे योग्य ठरेल. जीवनाच्या विविध अंगाचे लिखाण करण्याचे धाडस ही मंडळी करीत नाहीत."

"नवीन यांत्रिक युगाचा परिणाम म्हणजे त्याने माणसाचे हृदय काढून घेतलेले आहे. माणसामाणसात दुरावा निर्माण झाला आहे. बदलत्या संदर्भाची जाणीव मराठी कादंबरीकारास नाही. मानवी जीवनातील विकृतीचे– विकृती म्हणूनच लिखाण झाले पाहिजे. विकृती म्हणजे प्रकृती नाही याची जाण असली पाहिजे. कादंबरीमध्ये रेखाटले जाणारे जीवन हे संपूर्ण जीवनाचे एक अंग असले पाहिजे. कादंबरी ही केवळ कारागिरी नाही. प्रत्येक पात्राची दोरी लेखकाच्या हाती असलीच पाहिजे असे नाही. कोणतीही कलात्मकता ही तटस्थतेवर अवलंबून नसते. निर्माण होणारी पात्रे आपल्यापैकीच असली पाहिजेत. पात्रांच्या निवेदनातून त्यांच्या अंतर्गत असणारा अंतःप्रवाह किती जाज्वल्य आहे त्यावरच कादंबरीकाराचे यश अवलंबून आहे; आणि हे सर्व आपणास मराठी कादंबरीत दिसत नसल्याने असे म्हणावेसे वाटते की मराठी कादंबरीकार कादंबरीच्या सुरवातीस जी ध्येये उराशी बाळगतात त्यांचा त्यांना पुढे विसर पडतो आणि मग देवाच्या आळंदीस निघालेली ही मंडळी चोराच्या आळंदीस येऊन पोहोंचतात."

## सौ. पुष्पा भावे

मुंबई येथील एक सामाजिक कार्यकर्त्या व मराठी साहित्याच्या ख्यातनाम समीक्षक प्राध्यापिका सौ. पुष्पा भावे यांनी दलितांच्या सामाजिक अभिसरणावरील मांडलेले विचार अत्यंत मूलगामी स्वरूपाचे होते. अलिकडेच मराठवाड्यामध्ये घडलेल्या जातीय दंगलीच्या स्वरूपाचे अनुभव हे अत्यंत चिंतेचे स्वरूप धारण करू पहात आहेत. त्याचा आधार घेऊन बोलताना सौ. भावे म्हणाल्या, मराठवाड्यात जे काही घडले ते अत्यंत वाईट घडलं. त्याबाबत बोलताना अनेक माणसे अनेक प्रकारच्या अपुऱ्या माहितीच्या आधाराने बोलत होती. त्यातच या प्रकाराचा वृत्तपत्रातून येणारा वृत्तांत अत्यंत भडक स्वरूपाचा होता. आणि तो वस्तुस्थितीस सोडून होता. या पाठीमागे जी कारणे दडलेली आहेत ती अत्यंत घृणास्पद अशी आहेत. प्रत्येकाच्या मनात

गेली अनेक वर्षे जे खदखदत होते ते सर्वकाही या निमित्ताने अत्यंत जोमाने वर उफाळून आले.

दंग्याचे निमित्त तसे पाहिले तर अत्यंत किरकोळ असे होते पण गटागटातील वैमनस्य हे त्यामागील प्रमुख कारण होते.

मला कोणास तरी लाथ मारल्याचे समाधान हवे आहे. या भूमिकेतून अनेक प्रकारचे वर्ग अस्तित्व टिकवून आहेत. ज्यांना आपण काही द्यायचे आहे, त्यापाठीमागे केवळ करुणेची भूमिका असता कामा नये. तर त्यापेक्षाही त्या पाठीमागे न्यायाची भूमिका असेल तर या गोष्टी सर्वमान्य होतील. पण तसे घडत नाही. मराठवाड्यामध्ये ज्या जाती जमातींवर हल्ले करण्यात आले त्या पाठीमागील कारणे शोधली असता असे दिसते की तेथील महारांवर हल्ले झाले आहेत, कारण एकच की ही मंडळी आता आमच्या गावकीच्या उत्पन्नावर अवलंबून नाहीत. तो प्रकार ही मंडळी हळूहळू सोडू पहात आहेत. त्यांच्यामध्ये सुशिक्षितांचे प्रमाण वाढू लागले आहे. या समाजातील लोकांना आता माडीची घरे बांधण्याची कुवत निर्माण झाली पण आम्हाला समाजातील विशिष्ट वर्गाला, ही सुधारणा असह्य वाटते.गावकीच्या जुन्या व्यवस्थेबाहेर राहू पहाणाऱ्या सर्वच मंडळींना या दंगलीची झळ पोचली आहे. अनेक दिवसांचा मनात शिजत असलेला विद्वेष यावेळी उग्र रूपाने उफाळून वर आला होता. आपल्या सामाजिक दर्जाच्या कक्षा ओलांडू पहाणाऱ्याविरुद्ध काही ठराविक लोकांनी उचललेले हे पाऊल होते.

अलीकडे दलितांना ज्या सवलती देण्यात येतात त्याविषयी समाजातील काही ठराविक लोकांचे जे विचार बाहेर येत आहेत त्याविषयी बोलताना सौ. भावे म्हणाल्या, दलितांना ज्या सवलती देण्यात येतात ते त्यांना दिलेले एकप्रकारचे देणे आहे. ते त्यांनी आपले स्थान न सोडता स्वीकारले पाहिजे ; पण ही स्थिती दलित वर्गातील सुशिक्षितांना आता मान्य नाही. त्यांची आत्मजाणीव आता जागी होऊ लागली आहे. देशात व विशेषतः महाराष्ट्रात या प्रश्नाचे जे स्वरूप आहे ते अधिक गुंतागुंतीचे आहे. हा केवळ चातुर्वर्ण्याचा अगर वर्ग प्रश्न संघर्षाचा नाही. वर्णप्रश्न व वर्गप्रश्न यांचे यामध्ये एकप्रकारचे मिश्रण झालेले आहे.

या सर्व प्रश्नांपाठीमागे जसा समाजातील काही वर्गाचा संबंध आहे तसा राजकीय दृष्टिकोनातूनही हा प्रश्न सातत्याने तेवत ठेवण्याचे प्रयत्न झालेले आहेत. या प्रश्नांमध्ये खरा शत्रू कोण याची जाणीव या राजकारणी नेत्यांनी समाजास कधी दिलेली नाही. आपल्या काही राजकीय हेतुसिद्धिसाठी एका गटास दुसऱ्या गटाच्या विरुद्ध उठवण्याचे प्रयत्न सातत्याने केले जात आहेत, या प्रश्नाचे स्वरूप स्पष्ट करताना याबाबतीत शासनाच्यावतीने आम्ही अमूक गोष्टी केल्या, तमूक गोष्टी केल्या याचा डांगोरा पिटण्यात येतो. जे जाहीर करण्यात येते व जे प्रत्यक्ष या लोकांच्या हातात पडते यातील तफावत पहाता हा प्रश्न सुटूच नये अशी या पाठीमागे भूमिका आहे की काय अशी शंका येऊ लागते. राजकीय नेत्यांप्रमाणे समाजही या सर्व गोष्टीस तितकाच जबाबदार आहे. समाजातील प्रत्येक गटास थोडीफार संधी मिळताच आपल्या गटातील इतरांबरोबरचे संबंध तोडण्यास सुरवात होते. माणूस शिकू लागताच गावाशी त्याचे नाते तुटू लागते यामुळे सामाजिक सुसंवादाचे सूत्रच तुटत चाललेले आहे.

आज या समाजातील काही मंडळी उफाळून वर येत आहेत त्यांच्या या रागाच्या स्वरूपाविषयी आम्ही मंडळी खूपच चर्चा करत असतो. ही मंडळी देशात प्रतीकात्मक आंदोलन करीत नाहीत अशी टीका आम्ही करू लागतो. ज्या ठिकाणी या दंगली झाल्या तेथील अनेक दलित लोक गाव सोडून बाहेर पडले. त्यांना आज परत बोलावण्यात येत आहे. त्याचे प्रमुख कारण एकच आहे की इतक्या कमी मजुरीवर राबणारी माणसे गावात मिळेनाशी झाली. आपण सवलती जाहीर केल्या पण त्यातून सामाजिक सुसंवाद साधला किंवा नाही ही गोष्ट तपासून पहावी लागेल. आणि जर कोणी तो साधला आहे असा दावा करीत असतील तर तो कायम स्वरूपी आहे का ? असे विचारले तर उत्तर नकारात्मकच मिळत असते. सामाजिक अभिसरणच होणार नाही अशी सोय आम्ही केलेली आहे. या मंडळींना दिले जाणारे शिक्षण ठराविक वर्तुळात

राहूनच दिले जात आहे; आणि या सर्वांची जाणीव झाल्यानेच आजचा दलित तरुण, समाजाचे लक्ष वेधून घेण्यासाठी विविध मार्ग हाताळू लागला आहे.

राखीव जागा व सवलती या आपणास काही वर्षे ठेवाव्याच लागतील असा सल्ला देताना सौ. भावे म्हणाल्या, की त्यामध्ये समान संधीची व समान न्यायाची सवलत आहे का ? याचा विचार करावा लागेल. यासाठी गरज आहे ती महिला वर्गाच्या विचारजागृतीची ! माझ्याकडे जे जास्त आहे ते मी इतरांना देतो आहे अशी भूमिका मांडताना त्यात न्याय्यबाजूचे प्रमाण किती आहे हे तपासून पहावे लागेल. आपली काही तरी द्यायची तयारी असली पाहिजे; परंतु त्यामध्ये दयेचा भाग असता कामा नये. सामाजिक अभिसरणाचा वाटा उचलताना वरचा व खालचा ही वर्गात्मक जाणीव खरवडून टाकता आली पाहिजे. हा प्रश्न विचाराने व भावनेच्या स्पर्शाने सुटणार आहे.

### श्री. ग. मुणगेकर

यंदाच्या व्याख्यानमालेचा समारोप पुणे येथील दै. सकाळ या वृत्तपत्राचे संपादक श्री. श्री. ग. मुणगेकर यांच्या व्याख्यानाने झाला. राजकीयविषयावरील त्यांचे हे व्याख्यान अत्यंत सूत्रबद्ध विचाराने गुंफलेले होते. परराष्ट्रमंत्री अटलबिहारी वाजपेयी यांच्या आगामी चीन भेटीविषयी अनेकांची अनेक मते व्यक्त होत असताना त्यांच्या या भेटीपाठीमागील राजकीय हेतू व आंतरराष्ट्रीय वर्तुळात त्याचे उमटणारे पडसाद याची अत्यंत सुरेख मांडणी श्री. मुणगेकर यांनी आपल्या भाषणात केली. या भेटीशी निगडित असणारी भारताची हिमालयाची सीमा हा प्रमुख मुद्दा अनेकांच्या समोर आहे. त्याची सोडवणूक करणे हे एक दिव्य असले तरी आपण आशावादी रहाण्यास हरकत नसल्याचा निर्वाळा तर्कतीर्थ, लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी या प्रसंगीच्या प्रास्ताविकात दिला.

आज आपल्या देशाचे संबंध अनेक छोट्या छोट्या देशांशी चांगल्या रीतीने प्रस्थापित झाले आहेत. पण त्यामागे या छोट्या देशांच्या मनात आपल्याविषयीची भीती हे प्रमुख कारण असू शकते. असे सांगून श्री. मुणगेकरांनी भारत चीन संबंधातील सविस्तर मांडणी आपल्या भाषणात केली. ते म्हणाले, " श्री. वाजपेयी यांच्या भेटीने चीनशी आपले व्यापारीसंबंध आणखी सुधारतील असे खात्रीने सांगता येणार नाही त्याचप्रमाणे तंत्रज्ञानाची मदत भारत चीनला करू शकणार नाही. असे असता आपणास मुख्यत्वेकरून आपल्या हिमालय सीमेवरील आपले व चीनचे संबंध कसे राहतील याचाच विचार करावा लागणार आहे. त्या अर्थाने श्री. वाजपेयी यांची भेट अत्यंत महत्वाची ठरू शकेल असे वाटते.

चीनने भारताचा जो भाग घेतला आहे. तो परत मिळविण्याचे लष्करी सामर्थ्य भारतापाशी नाही हे उघड सत्य आहे. त्या बाबतीत आपण चीनला आपले म्हणणे मान्य करावयास लावू अशी परिस्थिती नाही. रशियाशी भारताचा जो करार झाला त्यामुळे चीन भारतीय सीमेवर सध्यातरी काही ढवळाढवळ करू शकणार नाही हे उघड आहे. आज रशियाने चीनवर एका अर्थाने फार मोठा दबाव आणलेला आहे. आणि त्यामुळे चीनची झालेली एक प्रकारची कोंडी ते फोडू इच्छित असावेत. भारताबरोबर काही चर्चा करून काही मार्ग निघू शकतो काय हे पहाणे हा एक प्रमुख हेतू चीनच्या मनात असावा असे वाटते.

हिमालय सीमेवरील आजच्या स्थितीचे स्वरूप स्पष्ट करताना श्री. मुणगेकर म्हणाले की, ' या सीमेशी एकूण पाच प्रश्न निगडित आहेत. ते असे की आक्साई चीनमध्ये गुंतलेला आपला भाग परत करावा, तिबेटचे फार मोठ्या प्रमाणात चीनने लष्करीकरण केलेले आहे आणि त्याचा भारतास नेहमीच धोका वाटत असतो त्या दृष्टीने हिमालय सीमेवर भारतास फार मोठे लष्कर ठेवणे भाग आहे त्यासाठी तिबेटमध्ये चीनने किती लष्कर ठेवावे याची मर्यादा निश्चित करावी लागेल. आज चीनने पाकिस्तानचे काश्मीर बाबतचे म्हणणे मान्य करू नये. पाकिस्तानमध्ये कोणतीच ढवळाढवळ न करण्याचे आश्वासन भारताने पूर्वीच दिलेले आहे. नेपाळ-भूतानशी भारताने ठेवलेले संबंध चीनने मान्य केले पाहिजेत. नागा बंडखोरांना चीनमध्ये जे लष्करी शिक्षण दिले जाते ते चीनने थांबविले पाहिजे. आपण यापूर्वीच मान्य केलेले आहे की, रशियाच्या चीनविरोधी ज्या कारवाया असतील त्यात भारत सहभागी

अनुक्रमणिका

होणार नाही. त्याचप्रमाणे दलाई लामांची सत्ता तिबेटमध्ये यावी यासाठी भारत कधीच प्रयत्न करणार नाही. तसेच खांबा टोळीवाल्यांना भारताने मदत करू नये. ज्या विशिष्ट बंडखोरांना चीन मदत देतो ती त्याने त्वरित थांबवावी.

प्राज्ञपाठशाळेच्या या सरस्वत्युत्सवातील अखंड ज्ञानसत्राने अनेक विषयांवरील जी चर्चा होते त्याचा समारोप संस्थेचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी स्वतःच करीत असतात. विषय राजकीय असो, वा धार्मिक असो किंवा साहित्यिक अथवा सामाजिक असो, त्यासंबंधीचे तर्कतीर्थ जोशी यांचे समारोपातील विचार अनेक नवीन मुद्यांना स्पर्श करून जात असतात. यंदाच्या व्याख्यानमालेतील दलितांच्या सामाजिक अभिसरणावरील सौ. भावे यांचे विचार व त्यानंतर श्री. जोशी यांनी केलेला समारोप बरेच काही सांगून गेला. मानवी जाती-जातीतील संकरामधून झालेले अभिसरण व त्यामागील मूलभूत स्वरूप याची श्री. जोशी यांनी केलेली मीमांसा सामाजिक विचारवंतांना प्रेरक ठरू शकेल अशी होती. भारतीय सीमांचे राजकीय व भौगोलिक स्वरूप व त्यांच्याशी निगडित असलेले प्रश्न यावरील तर्कतीर्थ जोशी यांचे विचार खुद्द संबंधित वक्त्यांना पण बरेच नवीन काही सांगून गेले.












रामचंद्र चिंतामण ढेरे

# ‘ गधेगाळी’च्या निमित्ताने

[ नवस्थापित ‘लोकसाहित्य संशोधन मंडळा’च्या चर्चासत्रात औरंगाबाद येथे दि. १६ एप्रिल १९७८ या दिवशी वाचलेला निबंध. – का. सं. ]

## शिलालेखांतील गधेगाळ

महाराष्ट्रात शिळांवर आणि ताम्रपटांवर कोरलेले जे अनेक दान-लेख उपलब्ध झालेले आहेत. त्यांच्या शेवटी काही शापाशीर्वादात्मक वचने उद्धृत केलेली असतात. ‘हे दानशासन जो मानील, त्याचे कल्याण होईल आणि जो त्याचा भंग करील, त्याला यातना भोगाव्या लागतील, त्याचे अकल्याण होईल,’ असा भाव या शापाशीर्वादात्मक वचनांतून व्यक्त केलेला असतो. शिवी आणि शाप यांतील सीमारेषा पुसट असते, हे आपण जाणतोच. शिवी आणि शाप हे दोन्ही शब्द शप् (= शापणे) या धातूवरूनच बनलेले आहेत. ज्याप्रमाणे शिवना (स्वप्न) हा प्राचीन मराठी स्वप् ( to dream) या धातूवरून बनलेला आहे, त्याचप्रमाणे शिवी हा शब्द शप् या धातूवरून बनलेला आहे. ‘शिवी’चे प्राचीन रूप ‘सवी’ (अनेक वचन : सविया) असेही आढळते. शिवी हे शापाचेच रूप असल्यामुळे कोरीव दानलेखांत जी शापवचने आलेली आहेत, त्यांत शिव्यांना स्थान मिळणे अस्वाभाविक ठरणार नाही. यांपैकी अनेक दानलेखांत ‘गधेगाळ’ या नावाने प्रसिद्ध असलेल्या शिवीची ठसठशीत नोंद केलेली आढळते. ‘गधेगाळी’चा आणखी एक विशेष असा की, ती जशी शब्दांकित केलेली असते, तशीच शिल्पांकित करून तिचा उत्कट दृक्प्रत्यय घडविण्याची व्यवस्था केलेली असते. ‘गधेगाळ’ म्हणजे गाढवावरून दिलेली शिवी. परंतु एवढ्या स्पष्टीकरणाने ‘गधेगाळ’ म्हणजे काय, ते नेमके लक्षात येणार नाही. ‘तू गाढव आहेस!’ ही शिवीही गाढवावरूनच दिलेली असते; परंतु ही शिवी म्हणजे गधेगाळ नव्हे. अशी शिवीही क्वचित् एखाद्या लेखात आढळते; परंतु शब्द आणि शिल्प या दोन्ही रूपांत अंकित झालेली प्रख्यात गधेगाळ याहून वेगळी आहे. लेखात नोंदविलेल्या दानशासनाचा जो भंग करील, त्याच्या आईचा (किंवा पत्नीचा) उपभोग गाढव घेईल, असे सांगणारी, खास मराठी शब्दावलीतील शिवी म्हणजे गधेगाळ होय. या शिवीचे शिल्पांकन करताना, आज्ञाभंग करणाऱ्या व्यक्तीची आई (अथवा पत्नी) ही विवस्त्र, ओणव्या अवस्थेत दाखविलेली असते आणि तिच्यावर मागून गाढव आरूढ होत असल्याचे दृश्य कोरलेले असते. महाराष्ट्रातील अनेक कोरीव लेखांत गधेगाळीचे जे वाचिक स्वरूप आहे, ते प्रत्यक्ष पाहिल्यावर आपणास या भडक शिवीची नेमकी कल्पना येऊ शकेल–[१]

१) इति शासनव्यवस्था जो चाली,
तेहाचिये माया गाढउ वलघे ॥

(अशी ही शासनव्यवस्था जो मोडील, त्याच्या आईवर गाढव चढेल.)

– माहुल शिलालेख : शक १०७५

२) जो...कवण विरुद्धिपूर्वक एयाचा लोप करी,
तेहाची माय गाढव झवे ॥

(जो कोणी विरोधपूर्वक याचा लोप करील, त्याच्या आईला गाढव उपभोगील. )

– ब्रिटिश म्यूझियम शिलालेख : शक १०७६

३) यस्तु परिपंथी भवेत् तस्य माता गर्दभेन ...

[ जो कोणी विरुद्ध मार्गाने जाईल, त्याची आई गाढवाकडून (उपभोगिली जाईल. ) ]

– वसई शिलालेख : शक १०८३

अनुक्रमणिका

४) इये शासने लिखिता भाषा जो लोपी अथवा लोपावि, तो गर्दभनाथु, तेहाचिए माए सूर्यपर्वे गर्दभु झवे ...

(या शासनात लिहिलेल्या भाषेचा जो कोणी लोप करील अथवा करवील, तो महागाढव आहे; त्याच्या आईचा सूर्यपर्वात गाढव उपभोग घेईल.)

– लोनाड शिलालेख : शक ११०६

५) जो कोणु हुवि ए प्रशासन लोपी...
तेहाची माय गाढवें झविजे ॥

(जो कोणी होऊन या प्रशासनाचा लोप करील, त्याची आई गाढवाकडून भोगिली जाईल.)

–परळ शिलालेख : शक ११०८

या पाच कालनिर्दिष्ट उदाहरणांवरून, इसवी सनाच्या बाराव्या शतकापासून महाराष्ट्रात गधेगाळ कशा प्रकारे वापरली जात असे, त्याची स्पष्ट कल्पना येते. यांपैकी क्रमांक ४ च्या उदाहरणात गाढवावरून दुहेरी शिवी दिलेली आहे. शासनभंग करणाऱ्यालाच प्रथम 'गर्दभनाथ' म्हणून संबोधिले आहे आणि मग त्याच्या आईशी गाढवाचा संबंध जोडला आहे. शासनभंग करणाऱ्यालाच 'गाढव' म्हटल्याची आणखीही उदाहरणे शिलालेखांतून आढळतात.[२] 'जो फेडी तो स्वान गाढवु चांडालु' असे सावरगाव लेखात म्हटले आहे, तर 'जो फेडी तो स्वप्नु गर्दभु चांडाळु' असे, जवळ जवळ त्याच शब्दांत चनई लेखात म्हटले आहे. पाटोदा येथील एका लघुलेखात 'धर्मु पालि ना तो गाढवु' असा, नुसते 'गाढव' म्हणण्याचा प्रकार निर्दिष्ट झालेला आहे; पूर्वनिर्दिष्ट दोन लेखात 'गाढवा'बरोबर 'श्वान' आणि 'चांडाळ' म्हणून शिव्या घातल्या आहेत.

क्रमांक ३ मधील गधेगाळ संस्कृतात असून तिच्यातील क्रियापद अध्याहृत आहे. माणिकपूर येथील शके ११११ मधील एका लेखात 'लुप्यति लोपायन्ति वा तस्य मातरं गर्दभेन झविजे।' अशी खास मराठी क्रियापदासह संस्कृतात गधेगाळ कोरलेली आहे;[३] तर तासगाव येथील यादव कृष्णाच्या शके ११७३ मधील लेखात 'तन्माता नवरासभेन रभसा सोपस्करं रम्यते।' अशा प्रकारे सुंदर प्रास साधून 'काव्यमय' भाषेत गधेगाळ कोरलेली आहे.[४] 'जो शासनभंग करील, त्याच्या मातेशी युवा गाढव अत्यंत आवेगाने आणि यथासांग रीतीने रममाण होईल,' असा भाव व्यक्त करणारे हे वचन कितीही 'सुसंस्कृत' शब्दांनी युक्त असले तरी ती इरसाल गधेगाळच आहे. यांशिवाय वेळुस, कोपराड, कालवार, काटी, बिडकीन, वेहरली, इत्यादी अनेक ठिकाणी मिळालेल्या लेखांत गधेगाळ आढळते.[५] वेळुस, कोपराड, कालवार, वेहरली इत्यादी ठिकाणी मिळालेल्या लेखांत शब्द आणि शिल्प अशा दोन्ही माध्यमांत गधेगाळ कोरलेली आहे. तर संगमेश्वर ( कर्णेश्वरमंदिर ), रांजली, धर्मापुरी इत्यादी अनेक ठिकाणच्या लेखांत गधेगाळीचे केवळ शिल्पांकन केलेले आढळते.[६] गधेगाळीची ही उपलब्धी कोरीव लेखांच्या विश्वात केवळ शिलालेखांत होते; 'ताम्रपटांतून मात्र कोठे गधेगाळ शब्दरूपाने किंवा चित्ररूपानेही दिसून येत नाही.'[७] त्याचे कारण अगदी उघड आहे; ताम्रपट हा विशिष्ट व्यक्तीच्या संग्रहात ठेवण्यासाठी लिहून ( कोरून ) दिलेला असतो, तर शिलालेखांतील दानशासन हे सर्व समाजासाठी केलेले प्रकटन असते. ताम्रपट हा केवळ वादप्रसंगी न्यायालयात वा राजसभेत सादर करण्यापुरताच वापरावा लागतो, तर शिलालेख हा जाता-येता कोणीही वाचण्यासाठी उघडा असतो. त्यांतील दान-शासनाचे पालन शिव्या-शापांच्या परिणामाच्या भयातून आणि पुण्याच्या प्रलोभनातून घडावे, अशी दात्याची अपेक्षा असते.

मराठी शिलालेखांतील गधेगाळीचे स्वरूप काय आहे, हे एवढ्या उदाहरणांवरून आपल्या लक्षात येईलच; परंतु त्यांतील अभिव्यक्ती-वैचित्र्याबरोबरच आशयवैचित्र्यही पहायला हवे. वेळुस येथील एका लेखात 'तेयाचिए माएसी गाडौ घोडु' असा गाढवाबरोबर घोड्याचाही वापर केलेला आहे,[८] तर दाभोळच्या लेखात 'त्यावरि व त्याचे मएवरि गडदो असे।' असा, शासनभंग करणाऱ्याच्या आईबरोबरच खुद्द त्याच्याशीही गाढवाचा 'संबंध' जोडला आहे.[९] बहुतेक लेखांत शासनभंग करणाऱ्याची अप्रतिष्ठा सूचित करण्यासाठी त्याच्या आईच्या शीलाचा अत्यंत विपरीत रीतीने भंग करण्याचे विधान केलेले आहे. याचाच अर्थ असा की, या लेखांच्या काळात समाजात सर्वाधिक प्रतिष्ठेचे नाते 'माता' हे आहे, असे मानले जात

होते. उत्तरकालीन दोन लेखांत मातेऐवजी पत्नीचा शीलभंग अभिप्रेत आहे. मिरजेच्या बारा इमाम दर्ग्यातील लेखात 'त्याचे बाइलेवरि गाढोऊ।' असे वचन आहे,[१०] तर विजापूरच्या ताजबावडीत मिळालेल्या लेखात 'खर बर झन व मादर–इ–उ सवार बाशद' ( त्याच्या बायकोवर आणि आईवर गाढव चढेल. ) असे फारसी वचन आहे.[११]

## संभोगक्रियावाचक मराठी क्रियापद

या प्रख्यात गधेगाळीचा विचार करताना तिचे तीन महत्त्वपूर्ण घटक सहज ध्यानी येतात. शासनभंग करणाऱ्या व्यक्तीशी प्रतिष्ठेचे नाते ( विशेषतः आई आणि त्यानंतरच्या क्रमात पत्नी ) असलेली स्त्री, गाढव आणि त्या स्त्रीशी गाढवाने आक्रमकतेने केलेली संभोगक्रिया. माता आणि पत्नी ही केवढी प्रतिष्ठेची नाती आहेत याची आपणास पुरेपूर कल्पना आहेच. उरलेल्या दोन घटकांपैकी गाढवाचा विचार आपण पुढे विस्ताराने करणार आहोत. स्त्री आणि गाढव यांची संभोगक्रिया सांगण्यासाठी जे क्रियापद गधेगाळीत वापरले गेले आहे, ते मराठी क्रियापद महाराष्ट्रात सुसंस्कृत समाजाकडून 'ग्राम्य' आणि म्हणूनच 'निषिद्ध' मानले गेले आहे. या संभोगक्रियावाचक मराठी क्रियापदाचा वापर एक तर शिवी देण्यासाठी केला जातो, नाही तर संभोगक्रियेविषयी हिडीस, घृणायुक्त, तुच्छतायुक्त भाव व्यक्त करण्यासाठी केला जातो. गधेगाळीत हाच भाव अभिप्रेत असल्यामुळे संस्कृत लेखांतील गधेगाळीतसुद्धा प्रायः मराठी क्रियापदाचाच वापर केला आहे.

हे संभोगक्रियावाचक मराठी क्रियापद देश्य नसून तद्भव आहे–संस्कृत धातूवरूनच आलेले आहे, असे इतिहासाचार्य राजवाड्यांनी दाखवून दिले आहे.[१२] राजवाड्यांच्या व्युत्पत्तिजिज्ञासेतून हा शब्द निसटलेला नाही.

राजवाड्यांनी हे संभोगक्रियावाचक मराठी क्रियापद धू ( धुवति–ते, धुनोति, धुनुते, धुनोति, धुनिते, धूनयति–ते ) या संस्कृत धातूवरून बनल्याचे सांगितले आहे. या धातूचा अर्थ हालवणे, खवळणे, स्पंदन पावविणे ( to shake, agitate, cause to move or tremble ) असा आहे आणि लक्षणेने तो संभोगक्रियेलाही लागू पडणारा आहे. राजवाड्यांनी दिलेल्या व्युत्पत्तीतून निष्पन्न होणारा या क्रियापदाचा अर्थ पाहिल्यावर आपल्या हे सहजच ध्यानी येते की, हा अर्थ केवळ एका जीवशास्त्रीय ( biological ) वास्तवाचा द्योतक आहे. त्यात आदिमता आहे आणि रतिविषयक प्रगत आणि प्रगल्भ जाणिवांचा त्यात अभाव आहे. म्हणूनच संभोगविषयक अप्रतिष्ठित भाव व्यक्त करण्यासाठी त्याचा वापर होत राहिला आहे.

आता विचारात घ्यावयाचा आहे 'गधेगाळी'-तील गधा. गाढवावरून शिव्या देण्याची परंपरा खूप पुरातन आहे– मराठीतही ती पुरातनच आहे. ज्ञानदेवांपासून तुकोबांपर्यंत सारे संतही ही परंपरा पाळताहेत.

## ज्ञानदेवांचा 'खर' दृष्टान्त

विदेही मुक्त असलेल्या गोविंदप्रभूंपासून अक्कलकोटच्या स्वामी समर्थांपर्यंत आणि चक्रधरांपासून तुकारामांपर्यंत अनेक सत्पुरुषांच्या वाणीत शिव्यांना स्थान लाभलेले आहे, हे आपणास माहीत आहे. अभिजात अभिरुचीने संपन्न असलेल्या मोरोपंतांनाही शिव्यांच्या प्रभावशालित्वातून सुटता आले नाही, याचाही अनुभव आपण घेतला आहे. ज्ञानदेव मात्र यातून मुक्त असावेत, अशी आपली स्वाभाविक अपेक्षा आहे. 'साच आणि मवाळ', तसेच 'मितले आणि रसाळ' असे अमृतकल्लोळासारखे शब्द ज्यांच्या मुखातून स्रवत होते, ते ज्ञानदेव– ऋजुता आणि मधुरता यांचा प्रकर्ष ज्यांच्या वाणीत झालेला आहे, ते ज्ञानदेव आपल्या रसनेला शिव्यांचा स्पर्श होऊ देणार नाहीत, असे आपणास वाटणे अगदी स्वाभाविक आहे. विशेषतः सात्त्विक संतापही ज्यांनी कधी जवळ केला नाही, खळांची खळता सांडावी, याचसाठी ज्यांनी करुणेची शिंपण केली, ते कुणाला शिव्या देतील, अशी कल्पनाही करवत नाही. परंतु आपल्या या अपेक्षेला ज्ञानदेवांच्या मृदु-मधुर वाणीनेही एक सौम्यसा धक्का एकदा दिलेला आहे. तेराव्या अध्यायात अज्ञानविवरण-प्रसंगी विषयासक्ताचे वर्णन करताना ज्ञानदेवांनी म्हटले आहे–

खरी टेंकों नेंदी उडे। लातौनि फोडी नाकाडें।
तऱ्हीं जैसा न काढे। माघौता खरु॥

अनुक्रमणिका

तैसा जो विषयांलागि । उडी घाली जळतिये आगीं ।
व्यसनाचि आंगिं । लेणीं मिरवी ॥
(ज्ञा. १३.७०४-५)

( गाढवीण गाढवाला स्पर्श करू न देता, उसळून मागील लाथेने त्याचे नाकाड फोडते, तरीही ज्या-प्रमाणे गाढव मागे सरत नाही, त्याप्रमाणे विषया-सक्त पुरुष जळत्या आगीसारख्या स्त्रीदेहाचा अुप-भोग घेण्यासाठी झेपावतो आणि त्या भोगातून प्राप्त होणारी संकटे ही शरीरावरील अलंकारांसारखी मिरवतो. )

ज्ञानदेवांच्या या 'खर' - दृष्टांताची प्रखरता वाचकांना विवरणाविनाही जाणवल्यावाचून राहा-णार नाही. आत शुद्ध नसताना 'बाह्यकर्म' ही शुद्ध विटंबना आहे, हे स्पष्ट करण्यासाठीं 'गर्दभु तीर्थि न्हाणिला' (ज्ञा. १३. ४६७) असा आणखी एकदा दृष्टान्तासाठी गाढवाचा उल्लेख त्यांनी केला असला, तरी तो इतका तीव्र नाही. त्यात केवळ गाढवाच्या अमंगळपणाचेच सूचन आहे. परंतु पहिला दृष्टान्त मात्र अंगावर शहारे आणणारा आहे: वाचकांना अस्वस्थ करणारा आहे. हा दृष्टान्त म्हणजे ज्ञानदेवांनी विषयलंपटांना दिलेली अेक तिखट शिवीच आहे, याविषयी आपली खात्री पटते आणि मृदु-मधुर वाणीचे ईश्वर असलेल्या ज्ञान-देवांनाही विषयलंपटांच्या किळसवाण्या वासनेच्या दर्शनाने संयम सोडण्याचा प्रसंग येतो, हे जाणवून जाते. अशा वासनेने बरबटलेल्या जनांचे वर्णन करण्यासाठी संभोगशील लोचट गाढवाशिवाय अन्य दृष्टान्त ज्ञानदेवांना सुचू नये ही वस्तुस्थिती गाढवाचे विपरीत 'महिमान' सिद्ध करणारी आहे.

## ज्ञानदेवांच्या 'खर' - दृष्टान्ताचे मूळ

ज्ञानदेवांचा हा 'खर' दृष्टान्त त्यांच्या प्रतिपा-दनाच्या संदर्भात कितीही प्रभावी असला, तरी तो ज्ञानदेवांच्या वाणीच्या प्रकृतीशी विसंवादी आहे, यात मुळीच संशय नाही. त्यामुळे ज्ञानदेवांच्या वागीश्वरीचे उपासक असलेल्यांना हा 'खर' - दृष्टान्त प्रखरपणे बोचत राहातो. श्रोत्यालाही ही बोच स्वस्थ बसू देत नाही. वाटते की, ज्ञानदेवांनी हा दृष्टान्त परंपरेत पावित्र्य पावलेल्या एखाद्या 'आर्ष' प्रकृतीच्या ग्रंथातून तर उचलला नसेल?

आणि आश्चर्य असे की, या दृष्टीने शोध घेऊ लागताच या दृष्टान्ताचा आढळ सर्व वैष्णवांना परमपूज्य असलेल्या श्रीमद्भागवतात होतो-एकदाच नव्हे, तर तीन वेळा होतो! एकादशस्कंधात एके प्रसंगी उद्धव श्रीकृष्णाला असा प्रश्न विचारतो की-

विदन्ति मर्त्याः प्रायेण विषयान् पदमापदाम् ।
तथापि भुंजते कृष्ण तत् कथं श्वखराजवत् ॥
( भा. ११. १३. ८ )

( हे कृष्णा, विषय म्हणजे आपदांचे स्थानच, असे सामान्यतः सर्व मर्त्य जन जाणतात; असे असूनही कुत्रा, गाढव आणि बोकड यांच्याप्रमाणे ते विषयाचे सेवन कसे करतात? )

भागवतकारांनी विषयासक्तांचे 'आदर्श' म्हणून येथे कुत्रा, गाढव आणि बोकड अशा तीन प्राण्यांचा उल्लेख केला आहे. यांपैकी गाढवाच्या विषयासक्तीचे विवरण एकनाथांनी आपल्या 'एकाकार' टीकेत पुढीलप्रमाणे केले आहे:-

ना तरी गाढवाच्या परी । दूरी देखोनियां खरी ।
भुंकत धावे तीवरी । लाज न धरी सर्वथा ॥
खरी पळे पुढें पुढें । खरू धांवे वाडेंकोडें ।
लाता हाणोनि फोडी जाभाडें । तरी पुढें पुढे धसों लागे ॥
लाता हाणे उरावरी । तरी तिची प्रीति धरी ।
ऐशिया स्त्रियांचे घराचारीं । खराच्या परी नांदती ॥
( ए. भा. १३।२१२-२१४ )

नाथांच्या ओव्या म्हणजे ज्ञानदेवांच्या 'खर' - दृष्टांताचे सुगम शब्दांत तंतोतंत अनुकरण आहे, असे वाटते. प्रस्तुत श्लोकात केवळ 'श्व-खर-अज-वत्' (कुत्रा, गाढव व बोकड यांच्याप्रमाणे) एवढेच शब्द असल्यामुळे, यातील खर-खरी-संबंधाचे चित्रण नाथांनी ज्ञानदेवांकडून उचलले असेल, असे आपणांस वाटणे स्वाभाविक आहे. परंतु मूळ एकादशस्कंधातच अन्यत्र, अगदी निःसंदिग्ध स्वरूपात 'खर' - दृष्टांत दिलेला आहे. तो ज्ञानदेवांच्या 'खर' - दृष्टान्ताचा मूलस्रोत आहे, अशी आपली खात्री पटेल. उर्वशीने झिडकारल्यानंतर पूरूरवा म्हणतो :-

कुतस्तस्यानुभावः स्यात् तेज ईशित्वमेव वा ।
योऽन्वगच्छं स्त्रियं यान्तीं खरवत् पादताडितः ॥
( भा. ११।२६.११ )

अनुक्रमणिका






– ( लाथा खाणाऱ्या गाढवाप्रमाणे त्या स्त्रीच्या-मागे मी पळत गेलो. आता माझी थोरवी, तेज, प्रभुता यांची काय किंमत राहिली, सांगा पाहू ! ) या श्लोकाचे विवरण करताना नाथ लिहितात :–

एवढाही मी राजेश्वरू । मागें धावें होऊनि किंकरू ।
तरी ते न करी अंगीकारु । जेवीं वोसंडी खरु खरी जैशी ॥
जेवीं खरी देखोनियां खरु । धांवोनि करी अत्यादरु ।
येरी उपेक्षूनि करी मारु । अतिनिष्ठुर लातांचा ॥
तिच्या लाता लागतां माथां । खरु निघेना मागुता
त्या खराऐशी मूर्खता । माझे अंगी सर्वथा बाणली ॥
( ए. भा. २६.१५१–१५३ )

याच संदर्भात भागवतकारांनी पुढे ( ११.२६-१३ ) 'स्त्रीभिर्गोखरवज्जितः' ( बैल अथवा गाढव याच्याप्रमाणे स्त्रियांकडून जिंकला गेलेला ) असा दृष्टान्त दिला आहे आणि नाथांनी त्याचे स्पष्टीकरण पुनः ( २६. १६४–१६५ ) 'खरी खरास हाणी लाताडें । तरी तो घसे पुढें पुढें ।' असेच दिले आहे.

यावरून हे स्पष्ट होईल की, ज्ञानदेवांचा 'खर' – दृष्टान्त म्हणजे भागवतातील 'खरवत् पादताडितः' ( ११.२६–११ ) या दृष्टान्ताचेच मराठीकरण आहे. पवित्र ग्रंथाचा अनुकार करताना संकोच बाळगायचा नसतो !

## गर्दभयुक्त वाक्प्रचार

ज्ञानदेवांनी लोचट विषयासक्ती आणि अमंगलता यांचा धिक्कार करण्यासाठी गाढवाचे दृष्टान्त दिले आहेत. तसेच ते अन्य अनेक मराठी साहित्यकारांनी दिले आहेत. या दोन 'गुणविशेषां'प्रमाणेच मूर्खपणा, ध्वनीची ( वाणीची ) कर्णकटुता, वर्तनातील असभ्यता या दुर्गुणांसाठीही गाढवाचे दृष्टान्त दिले जातात. मराठीतील अनेक वाक्प्रचारांत व म्हणींत गाढवाची ही 'गुणसंपदा' प्रकर्षाने अभिव्यक्त होत राहिली आहे"–

( १ ) गाढव ! ( मूर्ख, मंदबुद्धीचा । )
( २ ) गाढव ना ब्रह्मचारी, ( मूर्खही नाही किंवा शहाणा अथवा साधूही नाही. )
( ३ ) गाढवाच्या लेका ! ( मूर्खाच्या पुत्रा ! मूर्खाचा वंशज मूर्खच असणार. )



( ४ ) गाढवाच्या गोणीस खंडीभर तूट ( प्रमाणाबाहेर लुच्चेगिरी, नासधूस ).
( ५ ) गाढवाचा खरारा ( मूर्ख, टोणपा ).
( ६ ) गाढवासारखे ओरडणे ( बेसूर, कर्णकटू आवाज काढणे ).
( ७ ) गाढवी प्रेम ( असभ्यतेने, जंगलीपणाने व्यक्त होणारे प्रेम ).
( ८ ) गाढवाचा नांगर फिरविणे ( अवमानित करून सर्वनाश घडविणे ).
( ९ ) गाढवाचा गौरव करणे ( अपात्रीं सत्कार करणे ).
(१०) गाढवाचा घोडा बनविणे ( अशक्य गोष्ट शक्य करू पाहणे ).
(११) गाढवावरची गोमाशी ( नीचाच्या आश्रयाला असलेला नीच ).
(१२) ज्याचे त्याला आणि गाढव ओझ्याला ( गाढवाच्या कामाचे श्रेय इतरच लाटतात ).
(१३) गाढव माजला की अखेर आपलेच मूत पितो. ( मूर्ख जर उन्मत्त झाला तर स्वतःच आपली विटंबना करून घेतो. )
(१४) गाढवांचा गोंधळ आणि लाथांचा सुकाळ. ( मूर्खांचा अथवा असभ्यांचा समूह जमला की असभ्य वर्तनाचा प्रकर्ष होणार. )
(१५) गाढवही गेले आणि ब्रह्मचर्यही गेले. ( स्वार्थ ना परमार्थ ).

असे आणखी किती तरी वाक्प्रचार गाढवाच्या मूर्खतेचा, असभ्यतेचा, भारवाहकतेचा, आणि उन्मत्ततेचा उच्चार करणारे आहेत. अनेकविध अवगुणांचे स्वरूप प्रभावीपणे प्रकट करण्यासाठी वाणीने गाढवाचे दृष्टान्त वापरले आहेत. खरे तर खर, रासभ आणि गर्दभ हे गाढवासाठी वापरले जाणारे तीनही संस्कृत शब्द केवळ त्याच्या कर्णकटू ध्वनीशीच निगडित आहेत.[१४] गाढववाचक या तीनही शब्दांतून त्याच्या अन्य अवगुणांचा मुळीच बोध होत नाही. तरीही 'गाढव' म्हटले की आपल्या दृष्टीसमोर एक विरूप, अशोभनीय, अमंगळ, मूर्ख,

असभ्य, वेळी-अवेळी उन्मत्त होणारे 'ध्यान' उभे राहाते.

### निर्ऋतीचा प्रतिनिधी

परंतु या ध्यानालाही एक 'सांस्कृतिक प्रतिष्ठा' आपल्या परंपरेत प्राप्त झालेली आहे; एक विलक्षण प्रतीकात्मकता लाभलेली आहे : अर्थात् असंस्कृताचे द्योतन घडविण्यासाठी, विपरीताचे सूचन घडविण्यासाठी ? रामाशी शत्रुत्व बाळगणाऱ्या आणि सतीच्या शीलावर सदैव आघात करणाऱ्या उन्मत्त रावणाचा रथ गाढवे ओढीत असत, असे वर्णन महर्षी वाल्मीकींनी रामायणात केले आहे ते अत्यंत औचित्यपूर्ण वाटते.[१५] कारण उन्मत्ताच्या रथाला अविवेकाने गती द्यावी, हे अगदी क्रमप्राप्तच आहे.

पण, रावणाप्रमाणेच अश्विनौ देवांचाही रथ गाढवांनी का चालवावा, त्याचे कारण कळत नाही. कारण अश्विनौ देव हे देवांचे वैद्य आहेत; रोगनिवारक आहेत. जीवदायक आहेत. कदाचित् मूलतः जे रोगकारक शक्तीने युक्त असतात, तेच प्रार्थनेने प्रसन्न होऊन रोगनिवारक बनत असतील-जशी शीतला आहे, ज्येष्ठा आहे, निर्ऋती[१६] आहे. शीतला ही रोगकारक देवता आहे आणि तिचे वाहन गाढव आहे. देवी, गोवर, कांजिण्या आणि इतर अनेक बालरोग शीतलेच्या अवकृपेमुळे होतात; ती अपमृत्युकारिणी देवी आहे, आणि बालकांच्या रक्षणासाठीही तिला प्रसन्न करायचे असते. या शीतलेचे प्रणाममंत्रातील ध्यान असे आहे,[१७]

नमामि शीतलां देवीं रासभस्थां दिगम्बराम्।
मार्जनीकलशोपेतां शूर्पालंकृतमस्तकाम् ॥

( जिच्या हाती केरसुणी आणि कलश आहे, जिच्या मस्तकावर सूप शोभत आहे, जी नग्न असून गाढवावर बसलेली आहे, अशा शीतला देवीला मी नमन करतो. )

शीतलेचे हे ध्यान नीट न्याहाळून पाहता असे सहजी जाणवून जाते की, सूप, केरसुणी आणि गाढव या, तिच्याशी संबद्ध अशा तीन बाबींचा केरकचऱ्याशी, उकिरड्याशीं संबंध आहे. उकिरडा हा सर्व अमंगळाचे, अशुभाचे, रोगकारकतेचे आणि अवदशेचे माहेर असल्यामुळे उकिरडा फुंकणारा प्राणी रोगकारक देवीचे वाहन बनावा, हे क्रमानेच येते.

शीतला ही ज्या एका प्राचीन देवतेतून उत्क्रांत होत आली आहे, त्या ज्येष्ठा अलक्ष्मीचाही गाढवाशी संबंध असल्याचे पुरावे उपलब्ध आहेत. 'सुप्रभेदागम' या मूर्तिशिल्पविषयक ग्रंथात आणि तमीळ निघंटूत ज्येष्ठेला 'खरारूढा' ( गाढवावर आरूढ झालेली ) मानले असून, तमीळ निघंटू तिचे आयुध 'मार्जनी' ( केरसुणी ) हे असल्याची नोंद करतो.[१८]

ज्येष्ठा देवी ही लक्ष्मीविरोधी संकल्पना आहे-अलक्ष्मी आहे. लक्ष्मी ही श्री ( शोभा, समृद्धी, शुचिता ) असल्यामुळे जे जे 'श्रील' ( श्लील ) आहे, ते ते तिच्याशी निगडित होते; तर अलक्ष्मी ही साऱ्या 'अश्रीला'ला ( अश्लीलाला ) जवळ करते. विकास आणि विनाश, सुफलता आणि निष्फलता, शुचिता आणि अशुचिता, मंगळ आणि अमंगळ, समृद्धी आणि दरिद्रता या द्वंद्वांची प्रतीके लक्ष्मी-अलक्ष्मी या परस्परविरोधी देवतांच्या रूपाने पूजिली जातात.[१९]

आश्चर्य असे की, अवदशेचे प्रतीक म्हणून मिरवणाऱ्या शीतलेहून ज्येष्ठा जशी ज्येष्ठ ठरते, तशीच ज्येष्ठेहूनही ज्येष्ठ आहे वैदिक निर्ऋती-जी अदितीच्या विरुद्ध शक्तीची प्रतिनिधी आहे. निर्ऋती ही मृत्यूची, विनाशाची, अवदशेची देवता आहे. अदिती ही मातृत्वाची, समृद्धीची आणि सुफलतेची देवता आहे. अदिती आणि निर्ऋती ही दोन्ही पृथ्वीची नावे म्हणूनही वेदांत उल्लेखिलेली आहेत. परंतु परस्परविरुद्ध गुणधर्म व्यक्त करण्यासाठी पृथ्वीची म्हणजे मातीची ती दोन भिन्न रूपे आहेत : एक मातृत्वपोषक आणि दुसरे मृत्युकारक. मातृत्व आणि मृत्यू या परस्परविरुद्ध तत्त्वांची प्रतीके अनुक्रमे अदिती आणि निर्ऋती या दोन नावांनी उल्लेखिली गेली आहेत. वैदिक ऋषी अदितीला जवळ करू इच्छितात आणि निर्ऋतीला दूर दवडतात.

अशा या निर्ऋतीशी- शीतला आणि ज्येष्ठा यांच्या प्रकृतीशी सर्वस्वी समान असलेल्या आणि यांच्याहून प्राचीन असलेल्या निर्ऋतीशी गाढवाचा संबंध आहेच. ज्याच्याकडून ब्रह्मचर्यव्रताचा भंग घडला आहे, अशा व्यक्तीने पापक्षालनासाठी निर्ऋतीला गाढवाचा बळी द्यावा, असे म्हटले आहे.[२०] निर्ऋती ही यमाची सहचरी आहे. तिचे हे विशेष रामायणात एके प्रसंगी प्रकर्षाने प्रकटले आहेत-








त्रिजटेला पडलेल्या रावणविनाशाच्या स्वप्नांत. ते स्वप्न असे आहे की, 'रावण हा गाढवे जोडलेल्या रथात बसला आहे. आणि एक रक्तवस्त्री, कृष्णवर्णा व मोठ्या नेत्रांची स्त्री बळजबरीने रावणाची मानगूट पकडून तो रथ दक्षिण दिशेकडे नेत आहे. दक्षिण दिशा ही यमाची– मृत्यूच्या देवाची दिशा आहे, हे आपणांस माहीत आहे. अर्थातच त्रिजटेच्या स्वप्नातील ही स्त्री निर्ऋतीच्या सर्व लक्षणांनी युक्त आहे, यात कसलीच शंका उरत नाही.[२१]

शीतला, ज्येष्ठा आणि निर्ऋती या तीनही अशुभ व विघ्नकर देवतांशी गाढवाचा निकटचा संबंध पाहता, आपण असे निःशंकपणे म्हणू शकतो कीं, निर्ऋतीचा प्रतिनिधी असलेला हा प्राणी सुफलतेचा, समृद्धीचा, शुभतेचा दाता नसून, निष्फळतेचा, दरिद्रतेचा आणि अशुभाचा कारक आहे; म्हणूनच त्याचा ज्या स्त्रीशी बळजबरीचा संबंध जोडला जाईल, त्या स्त्रीची कूस वांझ होईल अथवा तिच्या उदरी अवदशा जन्म घेईल.

'तेयाची माय गाढवें झविजे' या शिवीत हे सारे सूचन आहे. वैदिक निर्ऋतीच्या संकल्पनेपासून लोकमानसात ज्या धारणा स्थिर झालेल्या होत्या, त्या सर्व धारणा या एका मराठी शिवीत उग्र स्वरूपात प्रकटल्या आहेत. हा केवळ पशू आणि मानवी मादी यांच्या विषम, विपरीत संबंधाचा उच्चार नसून, एका गंभीर आदिम धारणेचा आविष्कार आहे.

**निर्ऋतीचे उपस्थ**

'गधेगाळी' तला गाढव हा निर्ऋतीशी निगडित आहे. निर्ऋतीचा प्रतिनिधी आहे ; आणि निर्ऋती ही अवदशेची, अशुभाची, अमंगलाची आणि विनाशाची देवता आहे, हे आपण येथवर पाहिलें आहे. याच संदर्भात गाढवाशी संबंधित असा एक अपशब्दात्मक वाक्प्रचार ध्यानी घ्यायला हवा. 'गाढवाच्या गांडीत जाणे, घालणे' हा तो वाक्प्रचार होय. हा वाक्प्रचार जेव्हा दुसऱ्यासाठी वापरला जातो, तेव्हा त्यातून तुच्छतेचा, अवहेलनाचा, अप्रतिष्ठेचा तीव्र भाव व्यक्त होत असतो ; परंतु तो जेव्हा स्वतःच्या संदर्भात वापरला जातो, तेव्हा त्यातून वैताग, त्रागा, आत्मनिंदा उत्कटतेने प्रकट होत असते. 'नरकात जाणे, घालणे' या मराठी वाक्प्रचाराचा अथवा 'जहन्नममें जाना, ज़ाने देना' या हिंदी वाक्प्रचाराचा जो अर्थ आहे, तोच 'गाढवाच्या गांडीत जाणे, घालणे' या वाक्प्रचाराचा अर्थ आहे.

या वाक्प्रचारात गाढवाच्या पार्श्वेन्द्रियासाठी जो मराठी शब्द वापरला आहे, तो विशिष्ट संदर्भाने योनिवाचकही आहे, हे आपण जाणतो. संस्कृतातला 'उपस्थ' हा शब्द असाच गुद आणि योनी हे दोन्ही अर्थ व्यक्त करणारा आहे. निर्ऋती आणि गाढव यांच्या अतूट संबंधाचा धागा दृष्टीपुढे ठेवून या वाक्प्रचाराचा विचार करायचा झाला, तर त्याचे रहस्य सहजपणाने उमलून येते.

जनन, मरण आणि पुनर्जनन या जीवनचक्राचा प्रतीकसंभार आपल्या परंपरेत मातृगर्भाशयाशी निगडित आहे. मातृगर्भाशयातून जन्म घेणे, मृत्यूनंतर तिथेच (जननीजठरे) शयन करणे आणि कालांतराने पुनश्च तिथूनच जन्मास येणे असे ते जीवनचक्र मानले गेले आहे. या जीवनचक्रातला मृत्यूनंतरचा, पुनर्जन्मापूर्वीचा जो टप्पा आहे, तो महामातेच्या म्हणजे पृथ्वीच्या गर्भाशयात शयन करण्याचा आहे. आपल्या अंत्यक्रियाविधीचे जे आदिम रूप आढळते, ते या धारणेचे द्योतक आहे. मृताचे शव घटात ( मातृगर्भाशयाचे प्रतीक असलेल्या घटात ) ठेवून, ते भूमीत पुरीत असत, हे भारतातील अनेकानेक उत्खननांतून सिद्ध झालेले आहे.[२२]

या महामातेची द्विविध रूपे आहेत. हेही आपण पाहिलेच आहे. एक शुभंकर आणि दुसरे प्रलयंकर. एक पुनरुत्पादनशील अथवा पुनर्जननशील आणि दुसरे मृत्यूत रुतवून ठेवणारे. वैदिक ऋषींनी जिला अदिती म्हणून गौरविले, जिच्याकडे देवमातृत्व दिले, ते एक रूप आणि जिला निर्ऋती म्हणून संबोधिले, जिला विनाशकारिणी मानले, ते दुसरे रूप. अर्थातच निर्ऋतीच्या गर्भाशयात प्रविष्ट होणे म्हणजे मृत्यूत रुतणे, अवदशेशी निरंतर संगत करणे, अशुभाशी कायमचे नाते जोडणे. मातीचे एक रूप माता हे आहे आणि दुसरे मृत्यू हे आहे. वैदिक ऋषी जेव्हा मातीच्या मातृरूपाचा निर्देश करतात, तेव्हा 'अदितेरुपस्थे' (अदितीच्या योनीत – गर्भाशयात) असे शब्द वापरतात आणि जेव्हा ते तिच्या मृत्यूरूपाचा उल्लेख करतात, तेव्हा 'निर्ऋतेरुपस्थे' (निर्ऋतीच्या योनीत-गर्भाशयात ) असे शब्द वापर-

तात. निर्ऋतीच्या उपस्थाचा निर्देश असलेली चार-दोन अुदाहरणे मी येथे मुद्दाम उद्धृत करीत आहे-

( १ ) सुसुप्वासं न निर्ऋतेर् उपस्थे सूर्यं न दस्रा तमसि क्षियन्तम् । ... ( ऋ. १।११७।५ ) [ ( हे अश्विनौ देवांनो, ) निर्ऋतीच्या उपस्थात झोपी गेलेल्या किंवा अंधारात बुडून गेलेल्या सूर्याप्रमाणे ( किंवा जमिनीत पुरून ठेवलेल्या सोन्याप्रमाणे विहिरीत पडलेल्या वंदनाला तुम्ही बाहेर काढलेत. ) ]

( २ ) ये पाकशंसं विहरन्त एवैर्ये वा भद्रं दूषयन्ति स्वधाभिः ।
अहये वा तान् प्रददातु सोम आ वा दधातु निर्ऋतेरुपस्थे ॥
( ऋ. ७. १०४. ९ )

( जे सत्य भाषण करणाऱ्या मला दुर्भाषणाने वेडावतात, जे सामर्थ्यामुळे चांगले वर्तन करणाऱ्या मला दूषण देतात, त्या सर्वांना सोम सर्पांच्या तडाख्यात देवो किंवा निर्ऋतीच्या गर्भाशयात दवडो.)

( ३ ) उप सर्प मातरम् भूमि एतां उरुऽव्यचसम् पृथिवीं सुऽशेवाम् । ऊर्णऽम्रदा युवतिः दक्षिणाऽवते एषा त्वा पातु निर्ऋते उपस्थात् । ( ऋ. १०. १८. १० ) ( तू आता या भूमातेकडे, या विस्तीर्ण आणि सुमंगल पृथिवीकडे जा. दानशाली पुरुषाला ही जी मखमालीप्रमाणे मृदू लागते, ती ही यौवन-संपन्न पृथिवीच निर्ऋतीच्या उपस्थापासून तुझे रक्षण करील. )

( ४ ) सुऽदेवः अद्य प्रऽपतेत् अनावृत् पराऽवतम् परमाम् गन्तवै ऊं ( इति ) ।
अध्ःशयीत निः ऋतेः उपऽस्थे अध एनम् वृकाः रभसासः अद्युः ।
( ऋ. १० ९५. १४ )

[ ( पुरूरवा उर्वशीला म्हणतो : ) काय ? मग तुझा जो मी ( पतिरूप ) उत्कृष्ट देव तो एकूण आजच उघडा पडावा ना ? ह्या पृथ्वीच्या अगदी शेवटच्या सीमेवर जाऊन तेथे आपटावा ना ? काय मी निर्ऋतीच्या उपस्थात अगदी तळाशी जाऊन शयन करावे ? त्यापेक्षा अशा स्थितीमध्ये ह्या ( प्राण्या ) ला लांडग्यांनी ताबडतोब खाल्लेले काय वाईट ? ]

( ५ ) यदि क्षितऽआयुः यदि वा पराऽजितः यदि मृत्योः अन्तिकम् निऽइतः एव । तम् आ हरामि निः ऋते उपऽस्थात् अस्पार्षम् एनम् शतऽशारदाय ।
( ऋ. १०.१६१.२ )

( ह्याचे आयुष्य जरी संपले असले, किंवा जरी तो मृत होण्याच्या पंथाला लागला असला, तरी अशाही निर्ऋतीच्या उपस्थातून ह्या पट्ठा मी त्याला परत ओढून आणतो; आणि त्याने शंभर वर्षे जगावे इतकी त्याच्या ठिकाणी शक्ती उत्पन्न करतो. )

ऋग्वेदातील हे पाचही उल्लेख अत्यंत बोलके आहेत. 'निर्ऋतीचे उपस्थ' हे सर्व दुर्गतीचे गर्त असल्याची, मृत्यूचे वसतिस्थान असल्याची अत्यंत स्पष्ट धारणा या ऋचांतून व्यक्त झालेली आहे. विशेषतः तिसऱ्या क्रमांकाच्या उदाहरणात महामाता पृथ्वी आणि मृत्युरुपिणी निर्ऋती या दोघींचा विरोधात्मक उल्लेख एकत्र आलेला आहे. ती निर्ऋतिविषयक जाणिवांचे यथार्थ दर्शन घडविणारा आहे.

आता आपल्या सहज ध्यानी येईल की, 'निर्ऋतीचे उपस्थ' आणि 'गाढवाची गांड' या दोन वाक्प्रचारांचा अर्थ एकच आहे- ते दोन्ही परस्परांचे पर्याय आहेत. गाढव हा जर निर्ऋतीचा प्रतिनिधी आहे, तर 'निर्ऋतीचे उपस्थ' म्हणणे काय अथवा 'गाढवाची गांड' म्हणणे काय, दोहोंचा आशय अगदी एकच आहे. दुर्गती, निरयगती, मृत्यूची अखंड सोबत, अमंगळाचे माहेर हाच तो आशय आहे.

### गुदेंद्रियाची अधिष्ठात्री देवता

कोणत्याही गोष्टीचे अशुभाकडे गमन सूचित करण्यासाठी निर्ऋतीच्या उपस्थाचा उल्लेख केला जात असे, हे आपण पाहिले आहे. या संदर्भात आणखी एक नितांत महत्त्वपूर्ण असा संकेत ध्यानी घ्यायला हवा. तो संकेत असा आहे की, निर्ऋतीचा आणि उपस्थाचा ( गुदेंद्रियाचा ) निकटचा संबंध परंपरेत मानला गेला आहे. निर्ऋती ही गुदेंद्रियाची अधिष्ठात्री देवता आहे.

गुदेंद्रियीं विसर्ग विषयो ।
निर्ऋति अधिदैवत तेथील पहा वो ।
क्षरशक्तीचा तेथ निर्वाहो ।
यासी अलिप्त देवो अक्षरत्वें ॥
( एकनाथी भागवत, २२. ३६८ )

'विसर्ग' ('सर्गनिर्मिती'च्या विरुद्ध) हा ज्याचा विषय आहे आणि जे क्षरशक्तीचा आश्रय आहे. त्या गुदेंद्रियाचे अधिदैवत आहे निर्ऋती. अर्थातच परमेश्वर अक्षरत्वामुळे त्याहून अलिप्त आहे, असे एकनाथांनी म्हटले आहे.

## घोडेगाळ

गधेगाळीप्रमाणेच एक घोडेगाळही मराठीत प्रचलित आहे. 'घोडा लावणे' हा मराठी वाक्प्रचार शिवी देण्यासाठी वापरला जातो. 'थांब, तुझ्या आईला घोडाच लावतो!' किंवा 'तुझ्या आईला लावला घोडा!' या स्वरूपात शिवीचा वापर केला जातो, हे आपणास परिचित आहेच. 'लावणे' या क्रियेचा अर्थ संबंध आणणे, चिकटविणे, जोडणे असा जरी असला आणि लक्षणेने तो संभोगसूचक असला, तरी 'तेयाची माय गाढवें झविजे' या गधेगाळीतल्या क्रियेइतका तो भडक स्पष्टार्थक नाही, हे उघड आहे. भाव तोच असला, तरी तुलनेने सौम्य अशा क्रियापदाचा वापर घोडेगाळीत केलेला आहे.

घोडा आणि गाढव हे दोन्ही एकाच वर्गातील प्राणी असले, तरी घोडा हा गाढवाप्रमाणे अप्रतिष्ठित, अशुभ वा अमंगल केव्हाही मानला गेलेला नाही. उलट तो शौर्य आणि सौष्ठव यांचे प्रतीक मानला गेला आहे; पुरुषार्थाचा, पौरुषाचा आदर्श मानला गेला आहे. आपल्या परंपरेत वृषभाला जशी आणि जेवढी प्रतिष्ठा आहे, तेवढीच आणि तशी अश्वालाही आहे. 'पुरुषर्षभ' म्हणवून घेण्यात इथल्या वीरांना जेवढा अभिमान वाटत असे, तेवढाच गौरव 'युवनाश्व', 'भद्राश्व' अशी नावे स्वीकारण्यातही वाटत असे. पौरुषप्राप्तीच्या उपायाला 'वाजीकरण' (अश्वीकरण) अशी संज्ञा आहे, हे या संदर्भात ध्यानी घ्यावे. उमदेपणा, डौलदारपणा, गतिमानता यांसाठी प्रसिद्ध असलेला आणि वीरांना युद्धात साथ करणारा हा प्राणी राजवैभवाचे आणि असाधारण पौरुषाचे प्रतीक मानला गेला, तर त्यात मुळीच आश्चर्य नाही.

असे जर आहे, तर मग त्याचा शिवीसाठी वापर का केला जातो? तो जर हवाहवासा वाटणाऱ्या पुरुषाचा प्रतिनिधी मानला गेला असेल, तर त्याचा संबंध हा स्त्रीच्या अप्रतिष्ठेचा द्योतक का मानला जावा? अश्व–स्त्री–संबंध प्रारंभापासून असाच मानला गेला आहे, की 'घोडा लावणे' या शिवीमध्ये त्याच्या प्रतिष्ठित रूपाचे अवनयन (degradation) आहे? या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी आपल्याला पुनः वेदकाळात जायला हवे.

वेदकाळात आणि यज्ञपरंपरा जोवर अस्तित्वात होती, त्या काळापर्यंत स्त्रीचा अश्वाशी संबंध करण्याला महत्त्व देणारा एक विलक्षण विधी प्रचारात होता. त्या विधीचे नाव आहे अश्वमेध. 'अश्वमेध' यज्ञ करणारे राजे हे सार्वभौम मानले जात असत, हे आपल्याला ज्ञात आहे. रामायणाच्या बालकांडात दशरथाने आणि उत्तरकांडात रामाने हा यज्ञ केल्याचे वर्णन आलेले आहे. महाभारतात धर्मराजाने हा यज्ञ केल्याचे वर्णन आहे.

संतानप्राप्ती, राज्यवृद्धी आणि धनधान्याची समृद्धी साधण्यासाठी हा यज्ञ केला जात असे. 'अश्वमेध' या नावावरून हे स्पष्ट आहे की, या यज्ञात अश्वाला संस्कारपूर्वक निष्प्राण करवून (त्याचे 'शमन' करून) यज्ञाग्नीत त्याची आहुती देणे हा प्रधान विधी होय. परंतु आणखी एक अत्यधिक महत्त्वाचा भाग असा आहे की संस्कारपूर्वक 'शमविलेल्या' अश्वाला सोन्याच्या वर्तुळाकार मोठ्या चकतीवर ठेवीत; त्याच्या शेजारी त्याच चकतीवर राणीला–यजमानपत्नीला शयन करावे लागे; नंतर त्या दोघांवर एक वस्त्र पांघरले जाई; आणि राणी व अश्व यांचा हा सांकेतिक संबंध साजरा होत असताना, म्हणजे राणीला 'घोडा लावला' जात असताना या संबंधाविषयीचे मंत्र म्हटले जात असत. आज आपल्याला अश्लील वाटतील असे हे मंत्र राणी आणि अश्व यांच्या संभोगक्रियेचे प्रकट वर्णन करणारे आहेत, त्या क्रियेला उत्तेजन देणारे आहेत.

> स्वर्गे लोके प्रोर्णुवातां वृषा वाजश्वो
> रेतोधा रेतो दधातु।

[स्वर्गलोकी आच्छादित व्हा. हा सामर्थ्यवान् वीर्य धारण करणारा अश्व वीर्य (राणीच्या इंद्रियात) ठेवो.]

हा एवढा मंत्रार्थ पाहिला, तरी या विधीमागची भूमिका स्पष्ट होईल आणि राणीला घोडा का लावला जात असेल, याचे उत्तर मिळू शकेल.

सोन्याच्या वर्तुळाकृती चकतीवर वस्त्राने आच्छा-

दित होणारे हे, विषम भासणारे युगुल जरी प्रत्यक्षात या लोकी संमिलित होत असले, तरी हा विधी साजरा करणाऱ्यांच्या दृष्टीने तो पवित्र दिव्यलोकातच साजरा होत आहे.[२३] 'स्वर्गे लोके' या शब्दांतून इहलोकाचे दिव्यीकरण सूचित केले आहे. म्हणजे हा विधी पार्थिव नाही; त्याचे स्थान पार्थिव नाही; त्यात भाग घेणारे पार्थिव नाहीत; हे सर्व अपार्थिव, देवी पातळीवर घडते आहे, अशी दिव्यात्म जाणीव सर्वत्र आणि सदैव राखली गेली आहे. सोन्याची वर्तुळाकार चकती हे सूर्याचे– दिव्यलोकाचे प्रतीक आहे; त्याचप्रमाणे अश्व हा सूर्याचाच प्रतिनिधी आहे. नव्हे, तो सूर्य आहे; द्यौ आहे, दिव्यपुरुष आहे. आणि राणी ? ती विश्वजननीची, पृथ्वीची प्रतिनिधी आहे. अर्थातच राणी आणि अश्व यांचा हा सांकेतिक संबंध म्हणजे दिव्यलोकी घडणारे द्यावा–पृथ्वीचे मीलन आहे. या मीलनातून दिव्य प्रजा जन्मास येणार आहे; राज्यवृद्धी घडणार आहे; भूमी सुफलित, सुजला होणार आहे. राणीचा आणि अश्वाचा हा 'संबंध' मंत्रांत पूर्णतः प्रकटपणे खरा असल्याचे वर्णन असले, तर प्रत्यक्ष कृतीत तो सांकेतिकच असे. म्हणजे राणीला घोड्याचा (त्याच्या इंद्रियाचा) केवळ निकट स्पर्श घडविला जात असे; घोडा केवळ 'लावला' जात असे. 'घोडा लावणे' या मराठी शिवीत गधेगाळीतल्या प्रमाणे संभोगार्थक क्रियापदाऐवजी 'लावणे' हे केवळ स्पर्शार्थक क्रियापद का वापरले गेले आहे, याचे उत्तर अश्वमेधातील विधीच्या या सांकेतिक स्वरूपावरून आपणांस मिळू शकते.

अश्वमेध यज्ञातील 'घोडा लावण्या'च्या क्रियेमागील ही दिव्यात्म जाणीव पाहिली की 'घोडा लावणे' ही शिवी का बनावी, याचे कोडे पडते. गाढव आणि घोडा हे दोघे परस्परविरुद्ध तत्त्वांचे प्रतिनिधी आहेत. गाढव निर्ऋतीचा म्हणजे पर्यायाने यमाचा प्रतिनिधी आहे, तर घोडा हा सूर्याचा प्रतिनिधी आहे, प्रतीकरूपाने एक संहारक, अ–शुभकर आणि अमंगल आहे, तर दुसरा सुफलनकारक, शुभंकर आणि तेजस्वी आहे. एक 'अधम पुरुष' आहे, तर दुसरा 'दिव्य पुरुष' आहे. अेक अधोलोकाचा, तमाचा निवासी आहे; तर दुसरा ऊर्ध्वलोकाचा, स्वर्गाचा नि प्रकाशाचा सम्राट् आहे. त्याचमुळे एकाचा संबंध अवांछनीय, तिरस्करणीय आणि निषिद्ध आहे, तर दुसऱ्याचा संबंध हा नितांत वांछनीय, गौरवास्पद आणि म्हणूनच अवश्य कर्तव्य असा आहे. असे जर आहे, तर 'घोडा लावणे' ही शिवी का बनावी ? घोडा हा गाढवाच्याच पातळीवर का यावा ?

कारण, वेदकाळातही यज्ञसंस्थेच्या विरोधी असणारा जो समाज होता, त्याच्या दृष्टीने अश्वमेधासारखे सर्वच यज्ञविधी 'चमत्कारिक' मानले जाणे स्वाभाविक होते; तसेच पुढेही वैदिक परंपरेपासून दुरावलेला आणि वैदिकांच्या दृष्टीने 'पाखंडी' बनलेला जो फार मोठा समाज होता, त्यालाही हे सारे विधी विचित्र वाटणे स्वाभाविक होते. बौद्ध-जैनांनी आणि चार्वाकपंथीयांनी तर उघड उघड यज्ञसंस्थेसारख्या वैदिक आचारांची टर उडविली आहेच; परंतु जो सर्वसाधारण भारतीय समाज वैदिक मंत्रपूत आचारांना वंचित होता, त्यांपासून दूर होता-उदासीन राहिला होता, त्याला हे आचार नुसते गूढ नव्हे, तर विकृत वाटणे स्वाभाविक होते. म्हणजेच अश्वमेधासारख्या विधीतील दिव्यात्म जाणिवेला पारखा झालेला समाजच फार मोठा होता. या समाजाच्या दृष्टीने 'घोडा लावणे' ही शिवी बनावी, हे अगदी स्वाभाविक ठरते. एकदा एखाद्या विधीतील पावित्र्यांचा भाव गळून पडला-त्याचे de-sacralisation झाले, की मग त्या विधीचे जे स्थूल बाह्य रूप आहे, त्यावरूनच त्याचे मूल्य ठरणार, हे उघड आहे. अश्वमेधाच्या विधीतील राणी–अश्व–संबंध हा द्यावा–पृथ्वीचा दिव्य संबंध आहे, ही दिव्यात्म जाणीव गळून पडल्यावर उरतो तो केवळ नारी–पशु–संबंध ! हा संबंध मग नितांत गर्ह्य ठरला, त्यात आश्चर्य वाटण्याचे कारण नाही. अशा स्थूल, पार्थिव पातळीवर मग घोडा हा केवळ पशू ठरतो; ज्याचे इंद्रिय सुकोमल नारीला असह्य ठरावे, असा गाढवाच्याच श्रेणीचा पशू ठरतो. भारतीय कामशिल्पांच्या संभारात नारी–अश्व–संबंधाचे शिल्पांकन पहायला मिळते, ते अगदी गधेगाळीच्या शिल्पांकनासारखेच आहे– सजातीय मादीच्या अवस्थेत ओणवलेल्या स्त्रीवर मागून आरूढ होऊ पाहणाऱ्या अश्वाचे ! 'घोडा लावणे' ही

अनुक्रमणिका

शिवी बनली, ती अश्वमेधाच्या या पवित्रता–रहित ( desacralised ) अवस्थेत.

### गाढवाचा नांगर

मराठीतील या गधेगाळीच्या संदर्भातच 'गाढवाचा नांगर फिरविणे' या वाक्प्रचाराचाही विचार करायला हवा. एखाद्याचे समूळ उच्चाटन केल्याचा भाव व्यक्त करण्यासाठी हा वाक्प्रचार वापरला जातो, हे आपणांस माहीत आहे. कोणाही व्यक्तीचे, कुळाचे, समूहाचे अथवा अधिसत्तेचे सर्वस्व उध्वस्त केले आहे– अवमानपूर्वक उध्वस्त केले आहे, हे सांगण्यासाठी या वाक्प्रचाराचा उपयोग पूर्वीपासून होत आला आहे. 'अमक्या–तमक्याने त्याच्या घरादारावरून गाढवाचा नांगर फिरविला,' असे जेव्हा आपण म्हणतो; अथवा 'तुझ्या घरादारावरून गाढवाचा नांगर फिरवीन' अशी शिवी जेव्हा आपण देतो, तेव्हा उपमर्दयुक्त असे संपूर्ण उध्वस्तीकरण करण्याचा भाव त्या विधानात अभिप्रेत असतो.

परंतु हा वाक्प्रचार केवळ एक भाषिक व्यवहार नाही; तर प्रत्यक्ष कृतीचा वाचिक अवशेष आहे. म्हणजे घरादारावरून गाढवाचा नांगर फिरविण्याची प्रत्यक्ष कृती केली जात असे. आज जरी आपण या वाक्प्रचारातून केवळ लक्षणेने दुसऱ्याविषयीचा अनिष्टकारक भाव व्यक्त करीत असलो, तरी इतिहासात त्याच्या वाच्यार्थाचे, म्हणजे त्यातून व्यक्त होणाऱ्या प्रत्यक्ष कृतीचे पुरावे उपलब्ध होतात.

एका शिवकालीन 'सहा कलमी शकावली' मध्ये अशा कृतीची स्पष्ट नोंद आहे:[२४] "शके १५५२ प्रमोद नाम संवछरीं मुऱ्हार जगदेराऊ ईदलशाही मोटे फौजेनिसी निजामशाईवर चालोन आले. पुणा कसबा वस्ती जाळून गाढवाचा नांगर पांढरीवर धरिला. सात–आठ वर्षे कसबा वोस पडला होता. पाहार रोविली होती."

शके १५५२ (अि. स. १६३०) मध्ये म्हणजे शिवाजी महाराजांच्या जन्माच्या सुमारास आदिलशाहीतील एक मातबर सरदार मुरार जगदेवराव याने मोठ्या फौजेसह निजामशाहीवर चाल केली आणि निजामशाहीच्या हद्दीतील पुणे शहर जाळून त्याच्या पांढरीवर गाढवाचा नांगर फिरवला. ही घटना पूर्वनिर्दिष्ट शकावलीतील कलमात नोंदवली आहे. मुरार जगदेवरावाने केलेली ही कृती केवळ उध्वस्तीकरणाची नव्हे, तर मानहानीचीही आहे; अप्रतिष्ठेचीही आहे.

विरोधकाच्या मानभंगाची ही प्रथा शिवपूर्वकाळाइतकी तरी प्राचीन आहे, हे वरील नोंदीवरून आपल्या ध्यानी आले आहे. परंतु या प्रथेच्या आणि या प्रथेचे सूचन घडविणाऱ्या वाक्प्रचाराच्या प्राचीनतेचा शोध घेऊ लागल्यावर आपणांस दोन – अडीच हजार वर्षे तरी सहज मागे जाता येते. हरिभद्र आणि हेमचंद्र या दोन मध्यकालीन जैन ग्रंथकारांनी अनुक्रमे 'आवश्यकवृत्ति' आणि 'वीरचरित्र' या आपल्या ग्रंथांत, कोणा कोणिकाने वैशाली नगरीवर गाढवाचा नांगर फिरविल्याचे वर्णन केले आहे.[३५] संघम्–युगीन प्राचीन तमीळ वाङ्मयात 'शत्रूचे भूदुर्ग जमीनदोस्त करून, त्या रक्तलांछित भूमीवरून गाढवाचा नांगर फिरविण्याच्या प्रथेचे उल्लेख आढळतात, असे डॉ. के. ए. नीलकंठशास्त्री या थोर इतिहासकाराने म्हटले आहे.[३६]

या प्रथेच्या प्रचलनाचा याही पूर्वीचा पुरावा मिळतो, तो खारवेलाच्या हाथीगुंफा शिलालेखात.[३७] खारवेल हा अशोककालीन कलिंगाधिपती होय. त्याच्या या लेखाचा काळ आहे इ. स. पूर्व २०० ते १५० चा सुमार. या लेखात खारवेलाचे वर्णन करताना असे म्हटले आहे की,–

'मंडं च अवराजनिवेसितं पीथुड गदभनंगलेन कासयति ।' (खारवेल हा दुष्ट राजाची बाजारपेठ गाढवाच्या 'पृथुल' नांगराने नांगरतो.)

या पुराव्यामुळे प्रस्तुत प्रथेचे प्रचलन बावीसशे वर्षांपूर्वीपासून असल्याचे सिद्ध होत आहे. 'गदभनंगलेन कासयति' म्हणजे 'गर्दभलांगलेन कर्षयति' –गाढव जोडलेल्या नांगराने नांगरतो. नंगल हे रूप 'लांगल'पासूनच बनलेले आहे. ल आणि न यांचा येथे अभेद आहे. मराठीतील 'नुंगी' हे 'लिंग' या शब्दाचे लघुत्वदर्शक रूप लांगल – नंगल यांतील न – ल च्या अभेदानुसारच बनलेले आहे. कदाचित् आपणांस न – ल च्या अभेदाचे उदाहरण म्हणून लिंग–नुंगी हे शब्द उद्धृत करणे चमत्कारिक वाटण्याचा संभव आहे. परंतु लांगल हा शब्दही लिंगाशी संबंध राखणारा आहे, हे ध्यानी घेतल्यावर वरील

उदाहरण अप्रयोजकपणाचे वाटणार नाही. लिंग (पुरुषेंद्रिय), लांगल (नांगर), लांगूल (शेपूट), आणि लकुट अथवा 'लगुड' (लाकूड – दांडके – काठी) हे सर्व शब्द केवळ रूपानेच नव्हे, तर अर्थानेही एकाच कुलातले आहेत. हे मूळचे किरातवर्गीय (ऑस्ट्रिक) शब्द संस्कृत भाषेत आलेले आहेत.[२८] लिंग आणि शेपूट ही दोन्ही सारखी दिसणारी इंद्रिये असल्याने त्यांना एकाच शब्दाच्या किंचित रूपभेदांनी उल्लेखिण्याचा प्रघात पडला आहे. तसेच, लिंग आणि लांगल (नांगर) या शब्दांनी ज्यांचा बोध होतो, त्यांच्यात जसे रूपसाम्य आहे, तसेच क्रियासाम्यही आहे. स्त्रीच्या गर्भात बीजवपन करण्यासाठी तिच्या 'अंगा'त लिंग प्रविष्ट व्हावे लागते, त्याचप्रमाणे भूमीच्या गर्भात बीजवपन करण्यासाठी तिच्या 'अंगा'त लांगल प्रविष्ट व्हावा लागतो; 'लिंगांगसामरस्य' घडावे लागते.

गधेगाळीच्या संदर्भात 'गाढवाचा नांगर फिरविणे' हा वाक्प्रचार का विचारात घ्यावा लागतो, याचे रहस्य आता आपणांस सहज उलगडू लागेल. स्त्री आणि लिंग यांचा जो संबंध आहे, तोच भूमी आणि लांगल यांचा संबंध आहे. एखाद्याच्या मातेचा बळजबरीने गाढवाशी लैंगिक संबंध जोडण्याचा भाव जेवढा अवमानकारक आहे, तेवढाच आणि त्याच जातीचा अवमान एखाद्याच्या भूमीवरून गाढवाचा नांगर फिरविण्यात आहे. गाढव जोडलेला नांगर हे प्रतीकरूपाने गाढवाचे 'पृथुल' लिंगच होय. स्त्री ही जशी माता आहे, तशीच भूमी हीही माता आहे– महामाता आहे. मग ती 'पांढरी' (वस्तीची) असो अथवा 'काळी' (शेतीची) असो. स्त्री आणि भूमी (पृथ्वी) यांची एकरूपता आदिम काळापासून मानली गेली आहे. अपत्यांना जन्म देणारी माता आणि वृक्ष–वनस्पतींना जन्म देणारी भूमी यांच्यात एकरूपता अनुभवणे स्वाभाविक आहे. दोघीही सुफलनशील, आहेत. स्त्रीच्या सर्जनशीलतेसंबंधी वापरली जाणारी पुष्पिता, ऋतुमती, क्षेत्र, बीज, रज, फलशोभन इत्यादी शब्दावली ही भूमीच्या सर्जनशीलतेच्या संबंधातील आहे, हे उघड आहे. या शब्दावलीतून स्त्री आणि भूमी यांच्या एकरूपतेचा भाव अगदी स्पष्टपणे व्यक्त आहे. स्त्रीच्या जीवनात ज्याप्रमाणे ही भूमीशी संबद्ध परिभाषा वापरली जाते, त्याचप्रमाणे भूमीच्या जीवनात स्त्रीशी संबद्ध अशा अवस्थेची कल्पना केली आहे. वर्षाकालारंभी बीज धारण करण्यापूर्वी पृथ्वी रजस्वलावस्था अनुभवते, अशा कल्पनेचा आढळ आपल्या अनेक लोकसमूहांत होतो. भूमीच्या सुफलतेसाठीं स्त्रीचा वापर करण्याचे अनेक विधी जसे प्रचारात आहेत, त्याचप्रमाणे स्त्रीच्या सुफलतेसाठी भूमिद्रव्याचा वापर करण्याचेही अनेक विधी आहेत.[२९] या पार्श्वभूमीवर 'गाढवाचा नांगर फिरविणे' ही भूमातेच्या संदर्भात गधेगाळच ठरते, यात संशय उरत नाही. गधेगाळीचा उल्लेख करूनच सांगायचे झाले, तर असे म्हणता येईल की, 'तेयाची माय गाढवें झविजे' आणि 'तेयाची भूमाय गाढवें लांगलिजे (नांगरिजे)' या दोन्ही विधानांचा भाव एकाच पातळीवरचा आहे. पहिल्या विधानात शत्रूच्या अथवा विरोधकाच्या अथवा आज्ञाभंग करणाऱ्याच्या मातेची भयानक अप्रतिष्ठा सूचित झालेली आहे, तर दुसऱ्या विधानात त्याच्या महामातेची (भूमातेची) अप्रतिष्ठा व्यक्त झालेली आहे.

## सोन्याचा नांगर

'गाढवाचा नांगर' फिरविण्यातील हा अप्रतिष्ठेचा भाव आणखी स्पष्ट रीतीने समजून घेण्यासाठी एका तद्विरुद्ध कल्पनेचा आपण विचार करू. आपल्या भूमीवरून गाढवाचा नांगर फिरवून शत्रूने अथवा विरोधकाने आपली जी अप्रतिष्ठा केलेली असते, ती धुवून काढण्यासाठी आणि नव्या प्रतिष्ठित आणि संमानित जीवनाचे पुनरुत्थान घडविण्यासाठी त्याच भूमीवरून 'सोन्याचा नांगर' फिरविला जातो. मूरार जगदेवाने पुणे शहर भस्मसात् करून त्यावरून गाढवाचा नांगर फिरविला होता, या विषयीची 'सहा कलमी शकावली' मधील नोंद आपण पूर्वी पाहिलीच आहे. त्याच शकावलीत शेवटची नोंद पुढीलप्रमाणे आहे[३०] :–

> "शके १५५७ युव नाम संवत्छरीं शाहजी राजे भोसले यांसि बारा हजार फौजेची सरदारी औदलशाहीकडून जाली. सरंजामास मुलुक दिल्हे. त्यांत पुणें देश राजांकडे दिल्हा. राजांनी आपले तर्फेने दादाजी कोंडदेव

मलटणकर यांसि सुभा सांगून पुणियास ठाणें घातलें. तेव्हा सोन्याचा नांगर पांढरीवर धरिला. शांति केली. मग सुभेदार यांणीं कसब्याची व गावगनाची प्रांतांत वस्ती केली."

या नोंदीवरून स्पष्ट दिसते की, ज्या भूमीवर मुरार जगदेवाने गाढवाचा नांगर फिरविला होता, ते पुणे शहाजी राजांकडे आल्यावर त्यांचे सुभेदार दादाजी कोंडदेव यांनी तेथे सोन्याचा नांगर फिरवून नवी वस्ती केली. पूर्वीच्या अवमानाचे शल्य फेडून पुण्यात नवजीवनाची शुभंकर प्रतिष्ठा करण्याच्या हेतूनेच त्यांनी सोन्याचा नांगर फिरविण्याचा विधी आवर्जून पार पाडला, यात संशय नाही.

याचा अर्थ असा आहे, की गाढवाचा नांगर आणि सोन्याचा नांगर या परस्परविरुद्ध संकल्पना आहेत. गाढवाचा नांगर हा विनाशाचा, वांझपणाचा आणि अवमानाचा द्योतक आहे, तर सोन्याचा नांगर हा उत्कर्षाचा, सुफलनकारकतेचा आणि प्रतिष्ठेचा द्योतक आहे. गाढवाशी निगडित असलेला अशुभाचा, विनाशाचा अथवा वांझपणाचा भाव आपण पूर्वी पाहिलाच आहे. आता सोन्याशी उत्कर्षाचा, वैभवाचा, सुफलनकारकतेचा आणि सन्मानाचा भाव कसा निगडित होतो. ते आपणास पाहावयाचे आहे. सोन्याचे हे प्रतीकसामर्थ्य स्पष्ट झाले म्हणजे त्याचे गाढव-संपर्क पुसण्याचे कार्य आपोआप स्पष्ट होईल.

घोडा हा जसा सूर्यपशू आहे, तसेच सोने हे सूर्यधातू आहे. 'घोडा लावणे' या वाक्प्रचाराचे रहस्य उलगडण्याच्या प्रसंगी आपण हे पाहिलेच आहे की, राज्ञी (म्हणजे राजपत्नी) आणि घोडा यांच्या संबंधाचा विधी हा सोन्याच्या मोठ्या गोल चकतीवर साजरा केला जात असे. ही सोन्याची चकती म्हणजे सूर्याचे प्रतीक होय. घोडा हा सूर्याचा प्रतिनिधी आहे. द्यौचा अथवा दिव्य पुरुषाचा प्रतिनिधी आहे, हे दाखविण्यासाठीच राज्ञी-अश्वसंबंधाचा विधी सोन्याच्या गोल चकतीवर केला जात असे.

'सूर्य आणि सोने यांची परस्पर रूढ असलेली एकता' स्पष्ट करताना डॉ. डांगे म्हणतात, "अश्वमेधात निश्चेष्ट पडलेल्या अश्वाला सोन्याच्या मोठ्या वर्तुलाकार चकतीवर ठेवतात आणि त्याच्या आयाळीत सोने ठेवतात, तें यासाठीच ( शतपथ ब्रा. माध्यं. १३।५।२।२ व पुढे). सूर्याला सोन्याचा पाळणा म्हटलेले आहे. (७.८७.५); तसेच तो सुवर्णरूप झाला, असे म्हटलेले आहे. (ऋ.१.४६.१०) सूर्य म्हणजे अेक सोन्याचे चक्रच ! (ऋ.६.५६.३). हीच कल्पना पुढे सूर्यमंडळात दिसणाऱ्या सुवर्णपुरुषाच्या भावनेत स्पष्ट होते. (छांदोग्य उप. १.६.६). सूर्याचे एक रूढ विशेषण हिरण्यगर्भ हे होय. ऋग्वेदात हिरण्यगर्भ हा शब्द केवळ एकदा येतो. आणि तोही परंपरेने प्रजापतिसूक्तात येतो. (ऋ.१०.१२१.१). प्रजापति ही देवता ऋग्वेदात स्पष्ट होत नसली, तरी इतर देवतांपैकी केवळ सवितृ आणि सोम यांनाच प्रजापति हे विशेषण लागू आहे, हे विशेष होय. ( सवितृ ४.५३.२; सोम ९.५१९ ). अर्थात् हिरण्यगर्भ प्रजापतीची मूळ कल्पना सूर्याच्या सुवर्णगोलावरून सुचली, असे मानणे प्राप्त आहे. सोने हे प्रजापतीचे वीर्य आहे आणि त्यापासून निघाल्यावर त्याचे सूर्यात रूपांतर झाले. ( शत. ब्रा. ) "[११]

श्री. ए. एम्. होकार्ट यांनी अर्धशतकापूर्वीच ( १९२५ ) सोन्याची ही प्रतीकात्मकता शतपथ ब्राह्मणाच्या आधारे विशद केलेली आहे.[१२]

होकार्ट आणि त्यानंतर डांगे यांनी वैदिक वाङ्मयातील अनेक प्रमाणांनी सिद्ध केलेली सोन्याची ही प्रतीकात्मकता पाहता, सोन्याचा नांगर भूमीवरून फिरविण्याचा विधी हा द्यावा-पृथ्वीचा संगम सुचविणारा आहे, यात यत्किंचितही संशय उरत नाही. गाढवाचा नांगर फिरविल्यामुळे पृथ्वीशी-महामातेशी जो अधम पुरुषाचा संबंध आलेला असतो, त्या संबंधाचा परिणाम पुसून टाकण्यासाठी तिचा पुनः दिव्य पुरुषाशी संबंध येणे आवश्यक आहे. म्हणूनच दिव्य पुरुषाचे प्रतीक असलेल्या सोन्याच्या नांगराची योजना केली जाते. गाढवाचा नांगर हे अधम पुरुषाचे इंद्रिय आहे, तर सोन्याचा नांगर हे उत्तम पुरुषाचे म्हणजे दिव्य पुरुषाचे इंद्रिय आहे. एक अशुभकर व फलनाशक, तर दुसरे शुभंकर व सुफलनकारक !

### गाढवाची मिरवणूक

पृथ्वीच्या प्रबंधात गाढव हे अधम पुरुषाचे प्रतीक आहे आणि दिव्य पुरुषाच्या विरोधी भूमिका व्यक्त करण्यासाठी या प्रतीकाचा वापर केला जातो, हे स्पष्ट करणारा आणखी एक पुरावा आपल्या











लौकिक धारणांमध्ये उपलब्ध होतो, अगदी अलीकडे वृत्तपत्रात मुधोळ येथे घडलेल्या अेका चमत्कारिक घटनेची वार्ता प्रसिद्ध झाली आहे [३३] : –

"गळचात माळा घातलेल्या व गुलाल माखलेल्या गर्दभाची येथे अनेक वाद्यांसह मिरवणूक काढण्यात आली ! गाढवाच्या सोशिकपणाबद्दल, कष्टाळू वृत्तीबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी ही मिरवणूक असावी, असा अनेकांचा गैरसमज झाला होता, पण चौकशी करता कळले की, दोन महिने या भागांत मुळीच पाऊस नसल्याने मेघराजाला डिवचण्याकरिता गर्दभराजाची ही थाटाची मिरवणूक काढली गेली. अशीच गाढवाची मिरवणूक जमखंडी येथेही काढण्यात आली."

या वार्तेचे स्वरूप न्याहाळल्यावर पुढील महत्त्वपूर्ण बाबी आपल्या ध्यानी येतात–

(१) अवर्षणाची भीती निर्माण झाल्यामुळे पर्जन्यवृष्टीसाठी लोक उत्सुक बनले होते.

(२) पर्जन्यवृष्टीचा उपाय म्हणून गाढवाला सजवून त्याची वाजत–गाजत मिरवणूक काढली.

(३) गाढवाचा हा सन्मान मेघराजाला डिवचण्यासाठी केला होता. हेतू असा की, गाढवाच्या या सन्मानामुळे चिडून मेघराजाने धावत यावे.

(४) म्हणजे मेघराज आणि गाढव हे परस्परविरुद्ध तत्त्वाचे प्रतिनिधी आहेत, अशी या मागची लोकधारणा आहे.

पर्जन्यवृष्टी ही पृथ्वीच्या संतृप्तीसाठी, तिच्या सुफलनासाठी आवश्यक असते. पृथ्वीच्या उदरी अन्नाची गर्भधारणा व्हायची असेल, तर दैवी वीर्याचा–पर्जन्यजलाचा तिने स्वीकार करणे आवश्यक असते. पर्जन्यवृष्टी ही दिव्य पुरुषाची वीर्यवृष्टी आहे, अशी पुरातन धारणा चालत आलेली आहे. पर्जन्याचे वर्णन करताना, पृथ्वीशी समरूप असलेल्या स्त्रीने असा उद्‌गार काढला आहे की, "धरणीमाई, तुझा धावत आला पती !"

याचाच अर्थ असा आहे की, या चमत्कारिक घटनेतून व्यक्त होणाऱ्या लोकधारणेनुसार पृथ्वी आणि मेघराज यांचा अतूट शुभसंबंध आहे त्यांचे नाते हे दैवी नाते आहे. मेघराज हा पृथ्वीला संतृप्त करण्याच्या, तिला सुफलित करण्याच्या कर्तव्याला बांधलेला आहे : तो दिव्यलोकातला पुरुष आहे आणि पृथ्वी ही त्याची प्रिय पत्नी आहे. अर्थातच त्याचे पृथ्वीशी प्रतिष्ठेचे नाते आहे. या प्रतिष्ठेच्या नात्याला धक्का लावणारे कोणतेही कृत्य या दिव्य पुरुषाला सहन होणार नाही, अशी लोकमानसाची सश्रद्ध अपेक्षा आहे. म्हणूनच अवर्षणाने पृथ्वीविषयी उपेक्षा दाखवू लागलेल्या मेघराजाला डिवचण्यासाठी जणू लोकमानस त्याला 'गधेगाळ' देत आहे. 'तू वेळेस (ऋतुकाळी) तुझ्या पत्नीशी संबंध ठेवायला येत नाहीस, म्हणून आम्ही तिच्याशी गाढवाचा संबंध घडवून आणू.' 'ही धमकीच गाढवाच्या मिरवणुकीतून क्रियान्वित केली गेली आहे. 'तेयाचे बाइलेवरी गाढो।' या गधेगाळीसारखीच ही कृती आहे. मेघराजाला आपल्या पत्नीच्या अब्रूची काही चाड असेल, तर त्याने धावत यावे आणि अधमपुरुष–संबंधातून तिला वाचवावे, एवढा विलक्षण रहस्यार्थ या विचित्र वाटणाऱ्या घटनेतून व्यक्त होत आहे.

मराठी शिलालेखांत येणाऱ्या गधेगाळीचा उगम, प्रतीकार्थ आणि विविध रूपांतील वापर यांचा आपण येथवर जो शोध घेतला आहे, त्यावरून शिवीगाळीसारखा निंद्य सामाजिक आचारही सांस्कृतिक परंपरांचा वेध घेण्यासाठी कसा अभ्यसनीय आहे, याचा उत्तम प्रत्यय येतो. आजच्या सुसंस्कृत माणसाच्या दृष्टीने केवळ तुच्छच नव्हे, तर निषिद्ध आणि तिरस्करणीय ठरणारी शिवीगाळ जेव्हा आपण तटस्थपणाने अभ्यासाचा विषय बनवतो, तेव्हा एकेका शिवीचा मागोवा घेता घेता आपणांस मानवी संस्कृतीच्या आदिपर्वापर्यंतही पोचता येते; आणि लोकमानसातील किती तरी सुप्त-प्रकट रहस्यांची उकल करता येते. गधेगाळीसारख्या एका इरसाल शिवीच्या शोधातून घडलेला हा बोध या विषयाचे समाजशास्त्रीय, मानवशास्त्रीय आणि मानसशास्त्रीय अध्ययनातील महत्त्व सिद्ध करण्यास पुरेसा आहे, हे आता कोणीही नाकारणार नाही.

## संदर्भ – टीपा

१. शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख : वा. वि. मिराशी, नागपूर, १९७४. खंड २, लेखांक २६, २७, २९, ३०, ३२ ( पृ. १७८, १८०, १८६, १८९, १९६ ).
२. प्राचीन मराठी कोरीव लेख : संपा. शं. गो. तुळपुळे. पुणे, १९६३. लेखांक १३ (पृ. ७१ ). शोधमुद्रा : ब्रह्मानंद देशपांडे. औरंगाबाद, १९७६. पृ. १८, १०७.
३. Select Articles : G. H. Khare. Poona, 1966 p. 90.
४. तत्रैव, पृ. ९०.
५. प्राचीन मराठी कोरीव लेख, प्रस्तावना, पृ. ५७–५८. शोधमुद्रा, पृ. ९१ – ९२.
६. प्राचीन मराठी कोरीव लेख, प्रस्तावना, पृ. ५७ – ५८.
शिलाहार राजवंशाचा इतिहास आणि कोरीव लेख, खंड २, पृ. १७१.
शोधमुद्रा, पृ. ४५.
७. प्राचीन मराठी कोरीव लेख, प्रस्तावना, पृ. ५८.
८. तत्रैव, लेखांक ५८, पृ. ३०५.
९. Select Articles, p. 90.
१०. तत्रैव, पृ. ९०.
११. तत्रैव, पृ. ८८ – ९१.
१२. इतिहासाचार्य राजवाडे यांनी या क्रियापदाची व्युत्पत्ती अशी मांडली आहे :
" झव, झवणें : धव ( पुमान् ) = झव, धवति – झवे. तुझ्या आईचा मी झव – तव मातुः अहं धवः ।
झवणे : ( वि ) धुवनं – झुवणें – झुवणें. धवनं – झवणें – झवणें. धव म्हणजे नवरा, पती. त्याचे मुख्य कर्म धवन अथवा ( वि ) धुवन ( रत ); त्याचा अपभ्रंश झवणें. "
( भारत इतिहास संशोधक मंडळ अहवाल, शके १८३१ : संपा. खं. चि. मेहेंदळे. पुणे, शके १८३४, पृ. १५२. )
१३. महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोश, विभाग पहिला: संपा. य. रा. दाते, चिं. ग. कर्वे. पुणे, १९४२ पृ. ३७२, ३९२ – ३९५.
१४. 'कुमार' ( गुजराती ), जुलै १९६३, अंक ४७५, पृ. ३०७.
१५. रामायण, अरण्यकांड, ३५.६; ४५.१९ ( सातवळेकर आवृत्ती ).
१६. The Indian Theogony : Sukumari Bhattacharjee-Cambridge, 1970. pp. 80 – 92.
१७. The Indian Historical Quarterly. Vol. XIV, No. 1, March 1938 ( 'some Folk Goddesses of Ancient and Medieval India' : Article by J. N. Banerjee ), pp. 101 – 109.
१८. Elements of Hindu Iconography, Vol. I, part II, T. A. Gopinath Rao. Varanasi, 1971 ( second Edition ) pp. 390-400; प्रतिमालक्षणानि : ज्येष्ठा, pp. 157–159.
१९. संस्कृति–सुगंध : संपा. वें. ल. जोशी, रा. चिं. ढेरे, ग. उ. थिटे. पुणे, १९७७ ( द्वितीयावृत्ती ). पृ. २९३–३२४ ( 'ज्येष्ठा आणि ज्येष्ठराज' : रा. चिं. ढेरे ).
Goddess Lakshmi : Origin and Development : U. N. Dhal. New Delhi, 1978. pp. 129–163.

२०. Indiam Theogony, p. 84.
२१. रामायण, सुंदरकांड, २७.२०–२४ ( सातवळेकर आवृत्ती ).
२२. Burial Practices in Ancient India : Purushottam Singh. Varanasi, 1970. p. 174.
२३. अश्वत्थाची पाने : स. अं. डांगे नागपूर, १९७४. पृ. ६३–७६.
२४. शिवचरित्रप्रदीप : संपा. द. वि. आपटे, स. म. दिवेकर. पुणे, शके १८४७. पृ. ७०–७१.
२५. निवडक लेख, दुसरा खंड; ग. ह. खरे पुणे, १९७६ पृ. ४०.
२६. The Sangam Age : Its Cults and Cultures : K. A. Nilkanta Sastry. Madras, 1972. p. 58.
२७. निवडक लेख, दुसरा खंड, पृ. ४०–४१.
प्राचीन जैन इतिहास संग्रह, तृतीय भाग : ज्ञानसुंदर, फलोदी ( मारवाड ), वि. सं. १९९१ पृ. १६, २२.
२८. भारतीय आर्यभाषा और हिंदी : सुनीतिकुमार चाटुर्ज्या दिल्ली, १९५७. पृ. ५०.
भारतीय संस्कृतिमें आर्येतरांश : शिवशेखर मिश्र. लखनऊ, १९५२ पृ. ४९–५३.
२९. लज्जागौरी : रा. चिं. ढेरे पुणे, १९७८.
३०. शिवचरित्रप्रदीप, पृ. ७१.
३१. अश्वत्थाची पाने, पृ. ४९–५१, ६५.
३२. The Life-giving Myth : A. M. Hocart. London, 1973. p. 99 ( श्री. होकार्ट यांनी सोन्याची प्रतीकात्मकता ज्या ' Money ' या निबंधात स्पष्ट केली आहे, तो या पुस्तकातील निबंध १९२५ मधील आहे. )
३३. ' पाऊस पडण्यासाठी गाढवाची मिरवणूक ' ( वार्ता : ' सकाळ ', ३० सप्टेंबर १९७६ ),

—











वि. म. दांडेकर : अनु. मे. पुं. रेगे

# भारतीय समाजातील वर्गकलहाचे स्वरूप : उत्तरार्ध

[ डॉ. वि. म. दांडेकर ह्यांनी १९७८ मध्ये दिलेल्या ह्या कै. ग. रा. भटकळ स्मृति व्याख्यानाच्या पूर्वार्धाचा अनुवाद गेल्या अंकात प्रसिद्ध झाला आहे. उत्तरार्धाचा अनुवाद पुढे दिलेला आहे. मूळ इंग्रजी व्याख्यान 'अर्थविज्ञान' ह्या गोखले इन्स्टिटयूट ऑफ पॉलिटिक्स अँड इकॉनॉमिक्स, पुणे ह्या संस्थेच्या त्रैमासिकात जून १९७८ च्या अंकात प्रसिद्ध करण्यात आले आहे. त्याच अंकात डॉ. दांडेकरांच्या काही सहकाऱ्यांनी त्यांच्या व्याख्यानावर केलेली भाष्ये आणि चर्चेसाठी उपस्थित करण्यात आलेले मुद्दे मांडणारी टिपणे जिज्ञासूंना आढळतील. ह्या चर्चेच्या संदर्भात डॉ. दांडेकरांनी आपल्या भूमिकेचे जे 'पुर्नविधान' केले आहे तेही त्या अंकात प्रसिद्ध करण्यात आले आहे. ह्या पुर्नविधानाचा अनुवाद पुढे दिला आहे. —का. संपादक ]

---

आता सध्याच्या भारतीय समाजाकडे वळू या. मी प्रथम त्याच्या वर्गरचनेचे वर्णन करीन आणि नंतर आज त्याच्यात जो वर्गकलह प्रचलित आहे त्याच्या स्वरूपाविषयीचे माझे मत आपल्यापुढे मांडीन.

प्रथम वर्गरचनेचा विचार करू. १९७१ च्या शिरगणतीतील काही माहिती पुढे दिली आहे:— ही आता सात वर्षांनी जुनी झाली आहे. पण गेल्या सात वर्षांत वर्गरचनेत फार मोठे बदल घडून आले असणे फारसे संभवनीय नाही. शिरगणतीत सर्व व्यक्तींची दोन वर्गांत विभागणी करण्यात आली आहे : कामगार आणि कामगारेतर. जे काही काम करतात आणि त्या कामापासून ज्यांना काही प्राप्ती होते ते कामगार ; ते मजुरी मिळविणारेच असतात असे नाही. १९७१ मध्ये ५४.७९ कोटी ह्या सबंध लोकसंख्येतून १८.०४ कोटी व्यक्ती कामगारांच्या वर्गात अंतर्भूत करण्यात आल्या आहेत. मी आता ह्या कामगारांची, उत्पादनाच्या सामाजिक व्यवस्थेत त्यांचे इतरांशी जे उत्पादनसंबंध आहेत त्यांना अनुसरून, वेगवेगळ्या वर्गांत विभागणी करणार आहे.

प्रथम ज्यांचे अर्थार्जनाचे व्यवहार त्यांच्या घराच्या चौकटीतच चालतात, म्हणजे ज्यांचे उत्पादनसंबंध भांडवलशाहीपूर्व व्यवस्थेतील आहेत त्यांना एक वेगळा वर्ग म्हणून बाजूला काढतो. त्यांच्यात मुख्यत: तीन भिन्न गट आहेत. लागवड करणारे म्हणजे शेतकरी, शेतमजूर (हे प्रामुख्याने भूमिहीन आहेत) आणि घरी चालविण्यात येणाऱ्या उद्योगधंद्यांत गुंतलेले, म्हणजे कारागीर आणि हस्तव्यावसायिक. १९७१ मध्ये ह्यांच्या संख्या अशा होत्या : लागवड करणारे शेतकरी (७.८२ कोटी); शेतमजूर (४.७५ कोटी); कारागीर आणि हस्तव्यावसायिक (३६ लक्ष). ह्यांची बेरीज १३.२० कोटी होते. म्हणजे कामात गुंतलेल्या लोकसंख्येच्या ७० टक्क्यांपेक्षा हे अधिक आहेत.

उरलेले जे ४.७५ कोटी* कामकरी आहेत तेच काय ते भांडवलशाही अर्थव्यवस्थेच्या उत्पादनसंबंधात प्रविष्ट झाले आहेत असे म्हणता येईल. आणि ह्या सर्वांची मार्क्सप्रणीत बुर्ज्वाझी आणि कामगारवर्ग ह्या दोन वर्गांमध्ये विभागणी करता येईल असे नाही.

---

*ह्या जो ९ लक्षांचा फरक आहे त्याचे कारण असे : १८.०४ ही कामकऱ्यांची सबंध संख्या दिली आहे ती शिरगणतीतील संपूर्ण वर्गवारीला अनुसरून दिली आहे. उलट त्याची वेगवेगळ्या धंद्यामधील जी विभागणी दिली आहे ती शिरगणतीच्या एक टक्का वर्गवारीवर आधारलेल्या अंदाजाला अनुसरून दिली आहे.

अनुक्रमणिका

येथे एक भरघोस असा मध्यमवर्ग आहे. ही माणसे कुणाला कामावर ठेवीत नाहीत, ते मजुरी–कामकऱ्यांचे मालक नसतात किंवा ते स्वतः मजुरीवर काम करीत नाहीत, ते मजुरी–कामकरी नसतात. उत्पादनाची काही अल्प साधने त्यांच्या मालकीची असतात आणि त्यांच्या साहाय्याने ते स्वतःच काम करतात. त्यांची संख्या १.६० कोटी एवढी आहे. म्हणजे भांडवलशाही अर्थव्यवस्थेत काम करीत असलेल्या कामगारांच्या पुरेपूर एक तृतीयांश एवढी ती आहे. त्यांच्यामधील प्रमुख प्रकारांची दखल घेणे उपयुक्त ठरेल: त्यांतील ५६ लक्ष माणसे शिंपी, गवंडी, वाहातुकीच्या वाहनांवर काम करणारे, इ. ह्यांसारखे उत्पादन कामगार आहेत; २१ लक्ष माणसे गुरे पाळून दूधदुभत्याचा धंदा करणारे, कोंबड्या पाळणारे, मासे मारणारे कोळी असे आहेत. १९ लक्ष फराळाची दुकाने, लाँड्री, केशकर्तनालये, इ. सेवा पुरविणाऱ्या व्यवसायांत आहेत. शवटी, ४९ लक्ष दुकानदार आणि वेगवेगळ्या प्रकारचे विक्रेते आहेत. ह्यांतील बहुतेक सर्व धंदे भांडवलशाहीपूर्व सामाजिक अवस्थेत चालत असलेले धंदे होते आणि आता ते भांडवलशाही व्यवस्थेत चालत असलेले धंदे होते आणि आता ते भांडवलशाही व्यवस्थेत काहीशा वेगळ्या स्वरूपाच्या उत्पादनसंबंधांच्या आवर्तात खेचले गेले आहेत. शिवाय भांडवलशाही व्यवस्थेच्या स्वतःच्याच स्वरूपापासून निर्माण होणारे असे नवीन धंदेही अस्तित्वात आले आहेत; उदा. व्यावसायिक, तांत्रिक, शासकीय आणि व्यवस्थापकीय सेवा उपलब्ध करून देणारे धंदे. ह्या धंद्यांत दहा लाखांहून काहीशी कमी भरतील इतकी माणसे स्वतंत्र कामगार म्हणून गुंतलेली आहेत.

ही गोष्ट फिरून मांडू या. भांडवलशाही व्यवस्थेच्या उत्पादनसंबंधांत जे प्रविष्ट झाले आहेत असे म्हणता येईल अशा ४.७५ कोटी कामगारांपैकी १.६० कोटी इतके, म्हणजे एक तृतीयांश इतके कामकरी हे स्वतंत्र कामकरी आहेत, ते इतरांना कामावर ठेवणारे मालकही नाहीत किंवा इतरांनी कामावर ठेवलेले नोकरही नाहीत. म्हणजे ते बुर्झ्वाझीमध्ये मोडत नाहीत किंवा कामगारवर्गात मोडत नाहीत. उरलेले ३.१७ कोटी कामकरी काय ते मालक–नोकर संबंधाच्या संदर्भात काम करतात. ह्यांतील २२ लक्ष मालक आहेत आणि २.९५ कोटी नोकर आहेत. ह्या २२ लक्ष मालकांपैकी सर्वांनाच बुर्झ्वाझीमध्ये अंतर्भूत करणे योग्य ठरेल अशी खात्री मला वाटत येत नाही. त्यांच्यातील अनेक अल्प भांडवलावर धंदा करणारे लहान उत्पादक किंवा दुकानदार असतात; ते स्वतः काम करीत असतात आणि काही थोड्याच मजुरी कामगारांना कामावर ठेवीत असतात. शिरगणतीतून जी माहिती मिळते तिच्या आधारावर त्यांच्यामधील किती जणांचा बुर्झ्वाझीमध्ये अंतर्भाव करता येईल ह्याचा निर्णय करणे कठीण आहे. पण त्यांची संख्या लहान असावी अशी माझी अटकळ आहे. पण निश्चित माहितीच्या अभावी ह्या २२ लक्ष माणसांचा मिळून मालकांचा वर्ग बनतो आणि हा वर्ग म्हणजेच बुर्झ्वाझी असे मी मानणार आहे.

२.९५ कोटी मजुरी मिळविणारे नोकर म्हणून काम करतात आणि त्यांचा ह्या देशातील कामगारवर्ग बनलेला आहे. तथापि हा एक एकजिनसी, ज्याच्या घटकांत काहीच अंतर्गत भेद नाहीत असा समूह नाही. त्याच्यात जे प्रमुख प्रकार आहेत, त्यांची दखल घेण्यासारखी आहे. वस्तूंचे उत्पादन करणारे उद्योग आणि वहातूक ह्यांच्यांत मजुरीवर काम करणारे १.१८ कोटी लोक गुंतले आहेत; ह्यांच्यांत केवळ कष्ट करून मजुरी मिळविणाऱ्या कामगारांचाही अंतर्भाव होतो. डेअरी, पोल्ट्री इत्यादिकांत काम करणाऱ्या १९ लक्ष कामकऱ्यांची आणि वेगवेगळ्या प्रकारच्या सेवा पुरविणाऱ्या धंद्यांत काम करणाऱ्या ३६ लक्ष कामकऱ्यांची ह्यांच्यांत भर घातली पाहिजे. हे सेवा पुरविणारे कामकरी म्हणजे हॉटेल आणि रेस्टॉरंट यांच्यांत काम करणारे, घराची व्यवस्था पहाणारे मुनीम, स्वैपाकी, वेटर्स, घरगडी, इमारतीची देखभाल करणारे, झाडलोट करणारे, धोबी, न्हावी, पोलिसशिपाई, पहारेकरी वगैरे वगैरे. हे सर्व गट मिळून १.७३ कोटी कामगार बनतात आणि ते कामगारवर्गाच्या ६० टक्के इतके आहेत. आपल्याला त्यांचा 'नीळपेशे' कामगारवर्ग असा उल्लेख करता येईल पण त्यांच्यातील कित्येकांना, उदा. पोलिसशिपायांना

अनुक्रमणिका

स्वतःचा अंतर्भाव पांढरपेशा वर्गात होणे अधिक पसंत पडेल.

उरलेले १.२२ कोटी कामकरी पांढरपेशे (white collar) कामगार होत व कारकुनांपासून तो व्यवस्थापकांपर्यंतचा प्रांत ते व्यापतात. ह्यांतील ५६ लक्ष कारकून आणि १६ लक्ष विक्रेते आहेत. पांढरपेशा गटांची जी श्रेणी (hierarchy) आहे तिचा खालचा स्तर यांचा बनलेला आहे. उरलेल्या ४७ लक्ष कामकऱ्यांत व्यावसायिक, तांत्रिक, शासकीय, एक्झिक्युटिव्ह आणि व्यवस्थापकीय कामकऱ्यांचा अंतर्भाव होतो. पांढरपेशीयांच्या श्रेणीतील वरचा स्तर ह्यांचा मिळून बनलेला आहे. त्यांच्यापैकी कित्येकांचे हितसंबंध कामगारवर्गापेक्षा बुर्ज्वाझीच्या हितसंबंधांशी अधिक निगडित आहेत.

आजच्या भारतीय समाजात जे प्रमुख वर्ग आहेत त्यांचा संक्षेपाने निर्देश करायचा तर असा करता येईल :

| | कोटीत संख्या | |
|---|---|---|
| १. भांडवलशाहीपूर्व वर्ग | | |
| शेतकरी | ७.८२ | |
| शेतमजूर | ४.७५ | |
| गृहोद्योग (household | .६३ | |
| industry) | १३.२० | ७३.५% |
| २. भांडवलशाही व्यवस्थेतील | | |
| स्वतंत्र कामकरी | १.६० | ८.९% |
| ३. मालक | ०.२२ | १.२% |
| ४. पांढरपेशे नोकर | १.२२ | ६.८% |
| ५. नीळपेशे कामगार | १.७३ | ९.६% |

भारतीय समाजात जो वर्गकलह आढळून येत आहे त्याच्या स्वरूपाची तपासणी करायची तर ती ह्या वर्गरचनेच्या संदर्भात केली पाहिजे. ह्या वर्गकलहाचे स्वरूप आणि त्याच्या अस्तित्वात सुस्पष्ट पुरावा आज जे असंख्य संप घडून येत आहेत त्यांच्यामध्ये दृष्टोत्पत्तीस येतो. हे संप म्हणजे देशाच्या कारभाराचे एक सर्वसाधारण वैशिष्ट्य बनले आहे. पांढरपेशे कामगार आणि नीळपेशे कामगार ह्या दोहोंनाही ह्या संपांनी व्यापलेले आहे. कामकऱ्यांमध्ये, मग ते पांढरपेशे असोत किंवा नीळपेशे असोत, त्यांचे दरमहा उत्पन्न रु. २०० हून कमी असो किंवा रु. २०० हून अधिक असो, एकीची एक कौतुकास्पद वृत्ती आढळून येत आहे. तेव्हा सर्वच नोकरदारांचा, म्हणजे जे वेतन मिळवितात त्यांचा मिळून एक वर्ग बनतो असे मानणे योग्य ठरेल. हे मार्क्सच्या संकल्पनेला अनुसरून होईल आणि म्हणून या वर्गाला आपण कामगारवर्ग (proletariat) म्हणू या. आपल्या देशात ह्यांची संख्या २.९५ कोटी एवढी आहे, म्हणजे सर्व कामकऱ्यांच्या एक षष्ठांश आहे म्हणजे ह्या देशाचा कामगारवर्ग संख्येने लक्षणीय असला तरी तो एक लहान अल्पसंख्य गट आहे. मार्क्सने जाहीरनाम्यात जेव्हा कामगारवर्गाला उठाव करण्याचे आवाहन केले होते. तेव्हा त्याच्यासमोर एक वेगळे चित्र होते. "पूर्वीच्या सर्व ऐतिहासिक चळवळी ह्या अल्पसंख्यांच्या चळवळी होत्या. कामगारवर्गाची चळवळ ही प्रचंड बहुसंख्यांकांची, ह्या बहुसंख्यांकांच्या हितासाठी जाणीवपूर्वक, स्वतंत्रपणे करण्यात येणारी चळवळ आहे." मला असे म्हणायचे आहे की आज भारतात चाललेली कामगारवर्गाची चळवळ ही प्रचंड बहुसंख्यांकांनी चालविलेली चळवळ नाही; आणि ती प्रचंड बहुसंख्यांकांच्या हितासाठी म्हणून चाललेली आहे का हा प्रश्न आपण विचारला पाहिजे.

ह्या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी आपल्याला दुसरा एक प्रश्न विचारावा लागेल : 'तिचा रोख कोणाविरुद्ध आहे? ती कोणाविरुद्ध चाललेली आहे?' मार्क्सची समजूत अशी होती की कामगारवर्ग अनिवार्यपणे फक्त बुर्ज्वाझीविरुद्ध उभा ठाकेल. पण मार्क्सने असे म्हटल्यानंतर परिस्थिती काही प्रमाणात मार्क्सने सुचविलेल्या उपायांचा अवलंब केल्यामुळेच काहीशी अधिक गुंतागुंतीची बनली आहे. कम्युनिस्ट पक्षाच्या जाहीरनाम्यात मार्क्सने ज्या दहा कलमी कार्यक्रमाचा आराखडा दिला होता त्याच्यात पुढील तीन कलमांचा अंतर्भाव होता : (१) पतपुरवठ्याचे केंद्रीकरण राज्यसरकारच्या (The State) हातात असावे व ह्यासाठी राज्यसरकारने जिला भांडवल पुरविले आहे आणि जिला पूर्ण मक्तेदारी दिली आहे अशा राष्ट्रीयीकृत बँकेची स्थापना करावी; (२) दळणवळण आणि वहातूक यांच्या

साधनांचे केंद्रीकरण राज्यसरकारच्या हातात करावे; आणि ( ३ ) राज्यसरकारच्या मालकीच्या कारखान्यांचा आणि उत्पादनसाधनांचा विस्तार करावा. कामगारवर्गांच्या दडपणामुळे अनेक भांडवलशाही राज्यांत ह्या मार्गाने बरीच प्रगती केलेली आहे. भारत त्यांच्यात आघाडीवर असलेल्या राष्ट्रातील एक आहे. शिवाय राज्यसरकारने चालविलेल्या कल्याणकारी कार्यक्रमामध्ये ( welfare activities ) खूपच विस्तार घडून आला आहे. मार्क्सला ह्याची पूर्वकल्पना नव्हती. ह्याचा परिणाम असा झाला आहे की अनेक भांडवलशाही देशांमध्ये राज्यसरकार हे माणसांना कामावर ठेवणारा एक मोठा मालक बनले आहे. भारतात राज्यसरकार हा सर्वांत मोठा मालक आहे.

पूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे १९७१ मध्ये भारतात २.९५ कोटी नोकर, म्हणजे वेतन मिळविणारे होते. ह्या सर्वांपुढे काही बुर्ज्वाझी हा वर्ग मालक म्हणून खडा नव्हता. काहीजणांपुढे राज्यसरकार मालक म्हणून खडे होते, काहीजणांपुढे बुर्ज्वाझीचा वर्ग मालक म्हणून खडा होता आणि इतरांपुढे एखादा लहान कारखानदार किंवा लहान दुकानदार मालक म्हणून खडा होता. दहा किंवा अधिक मजुरी– कामगारांना कामावर ठेवणारे ते बुर्ज्वाझी अशी व्याख्या करणे सोयीचे ठरेल. मार्च १९७४ च्या 'एम्प्लॉयमेंट रिव्ह्यू'मध्ये नोकऱ्यांच्या वर्गवारी-विषयी पुढील माहिती मिळते. सार्वजनिक क्षेत्र ( public sector ) : १.२५ कोटी; खाजगी क्षेत्रातील दहा किंवा अधिक कामगारांना कामावर ठेवणारी उत्पादनकेंद्रे : ६८ लक्ष. ह्या दोहोंची मिळून १.९३ कोटीएवढी संख्या होते आणि त्यांचा संघटित क्षेत्रातील नोकऱ्या असा निर्देश करण्यात येतो. उरलेल्या नोकऱ्या खाजगी असंघटित क्षेत्रात, म्हणजे प्रत्येकी १० पेक्षा कमी नोकर कामावर ठेवणाऱ्या उत्पादनकेंद्रांतच आढळून येतात. मार्च १९७१ मध्ये नोकरांची एकूण संख्या २.९५ कोटी एवढी होती. मार्च १९७४ मध्ये ती काहीशी अधिक असेल. पण मार्च १९७१ मध्ये नोकरांची जेवढी संख्या होती तेवढीच मार्च १९७४ मध्येही होती– म्हणजे २.९५ कोटीएवढी होती असे मानले तर (२.९५-१.९३) कोटी, म्हणजे १.०२ कोटी एवढे कामगार असंघटित क्षेत्रात नोकरीवर होते हे स्पष्ट आहे.

तेव्हा निष्कर्ष असा : मार्च १९७४ मध्ये वेतन मिळविणारे जे एकंदर ३ कोटी नोकर होते त्यांच्यामधील ४० टक्क्यांहून अधिक राज्यसरकारचे नोकर होते ; ३५ टक्क्यांहून अधिक लहान उद्योजक आणि लहान दुकानदार यांचे नोकर होते; २५ टक्क्यांहून कमी एवढेच कायते बुर्ज्वाझीचे नोकर असलेले कामगार होते आणि हे सुद्धा प्रत्येकी १० लोकांपेक्षा अधिकांना कामावर ठेवणाऱ्या सर्व उत्पादनकेंद्रांच्या मालकांचा बुर्ज्वाझीमध्ये अंतर्भाव करण्याइतका 'बुर्ज्वाझी'चा उदार अर्थ लावला तर. (एकच मालक अनेक उद्योगकेंद्रांचा धनी असू शकतो ही गोष्ट मी ध्यानात घेतलेली आहे.) तेव्हा वेतन मिळविणारे हे जे कामकऱ्यांचे तीन प्रकार आहेत त्यांच्याकडून आपापल्या मालकांविरुद्ध चालविल्या जाणाऱ्या वर्गलढ्याचे स्वरूप आपण तपासून पाहिले पाहिजे.

प्रथम राज्यसरकारचे जे नोकर आहेत म्हणजे सार्वजनिक क्षेत्रातील जे कामकरी आहेत त्यांचा विचार करू. त्यांची संख्या १.२५ कोटी एवढी आहे आणि ते ह्या देशातील कामगारवर्गाच्या ४० टक्के एवढे, थोडे अधिक आहेत. ह्यापैकी ६२ लक्ष लोक म्हणजे एकंदर संख्येच्या निम्मे, शासकीय सेवांमध्ये आणि शिक्षण, आरोग्य ह्यासारख्या कल्याणकारी सेवांमध्ये गुंतलेले आहेत. दुसरे एक चतुर्थांश लोक, म्हणजे ३३ लक्ष लोक रेल्वे, टेलिग्राफ, बँकिंग, विमा, वीज, गॅस, पाणी, साफसफाई इ. सार्वजनिक सेवांमध्ये गुंतलेले आहेत. ह्या सर्व क्षेत्रांमध्ये सरकारला पूर्ण, अबाधित अशी मक्तेदारी आहे. सरकार आपण उपलब्ध करीत असलेल्या ह्या सेवांचे मूल्य कामकऱ्यांनी केलेल्या सेवेचे ते जेवढे मूल्य करते तेवढेच करते. काहीही अतिरिक्त मूल्य (surplus value) निर्माण होत नाही आणि ह्या कामकऱ्यांचे मार्क्सच्या अर्थाने शोषण ( exploitation) होऊ शकत नाही. सार्वजनिक क्षेत्रातील उरलेले ३० लक्ष नोकर हे सरकारने आपले व्यवहार ज्या उत्पादक क्षेत्रांमध्ये विस्तारलेले आहेत त्यांच्यात काम करतात. ही क्षेत्रे म्हणजे वस्तूंचे उत्पादन, बांधकाम, खाणी, जंगल इ. क्षेत्रे. ह्या क्षेत्रांतील बऱ्याच क्षेत्रांत सरकारला मक्तेदारी आहे; जवळजवळ मक्तेदारी आहे किंवा अल्पाधिकार ( oligo-

poly) आहे. ह्यातून झालाच तर फारच थोडा नफा होतो.

मग सार्वजनिक क्षेत्रातील वेतन मिळविणारे कामकरी सरकारविरुद्ध जो लढा उभारतात त्याचे समर्थन कशावर आधारता येईल ? ह्या सबंध परिस्थितीकडे पुढील दोन भिन्न दृष्टिकोनांतून पहाता येईल आणि त्यांतील कोणत्यातरी एकाचा आपल्याला अवलंब करावा लागेल. एकतर, सरकार हे सबंध समाजाचे प्रतिनिधित्व करते असे मानावे लागेल. मग सरकारी नोकरी ज्या लोकांची सेवा करतात त्यातील बऱ्याच मोठ्या लोकसंख्येच्या सर्वसामान्य परिस्थितीहून, हे नोकर ज्या परिस्थितीत जीवन कंठतात आणि काम करतात ती जर निकृष्ट असेल, तर आणि तरच त्यांचे काही रास्त गाऱ्हाणे आहे असे म्हणता येईल. पण वतुस्थिती अशी आहे असे म्हणता येणे कठीण आहे.

दुसरा पर्याय असा की मार्क्सकडे परत वळून सार्वजनिक क्षेत्र आणि खाजगी क्षेत्र हृयांच्यात कोणताही भेद करायचे कारण नाही असे मानणे; दुसऱ्या शब्दात सरकार आणि बुर्ज्वाझी यांच्यामध्ये भेद न करणे. मार्क्सने असे म्हटलेले नाही का की, 'आधुनिक राज्याचे जे सरकार असते ती म्हणजे बुर्ज्वाझीचे जे समान व्यवहार असतात त्यांचे व्यवस्थापन करणारी समिती असते.' आपल्या देशातील कामगारवर्गाचे जे पुढारी आहेत ते सरकारविषयी हाच दृष्टिकोन स्वीकारतात असे म्हणायला हरकत नाही. असे जर असेल तर मार्क्सने जे आणखी काही म्हटले आहे तेही आपण ध्यानात ठेवणे योग्य होईल. मार्क्सने असे म्हटले आहे की आधुनिक उद्योगधंद्यांचा विकास घडवून आणताना "बुर्ज्वाझी ज्या अनेक गोष्टी निर्माण करते त्यातील सर्वांत लक्षणीय काय असेल तर स्वतःचे (बुर्ज्वाझीचे) थडगे खणणाऱ्यांची ती करीत असलेली निर्मिती." नियोजित आर्थिक विकास घडवून आणण्याचे काम हाती घेणारे, कल्याणकारी सेवांचा विस्तार घडवून आणणारे आणि आपले व्यवहार उत्पादनाच्या क्षेत्रातही वाढविणारे जे आधुनिक कल्याणकारी राज्य आहे त्यालाही ही गोष्ट लागू पडते. ही वेगवेगळी कामे हाती घेतल्यामुळे सार्वजनिक क्षेत्रातील नोकऱ्या वाढवाव्या लागतात. जर हे नोकर आणि त्यांचे पुढारी सार्वजनिक क्षेत्र आणि खाजगी क्षेत्र ह्यांच्यांत भेद करणार नसतील किंवा कल्याणकारी राज्य आणि खाजगी भांडवलदार ह्यांच्यांत भेद करणार नसतील, तर सार्वजनिक क्षेत्रात वेतन देणाऱ्या नोकऱ्या वाढवून आधुनिक कल्याणकारी राज्य, इतर कशाहीपेक्षा, स्वतःचे थडगे खणणाऱ्यांचीच निर्मिती करते असे म्हणावे लागेल. अलिकडल्या काही वर्षात अनेक भांडवलशाही देशांतील मजूरपक्षाच्या सरकारांना ह्या गोष्टीचे अधिकाधिक प्रत्यंतर येत आहे.

ह्यानंतर आता लहान मालकाच्या कामकऱ्यांकडे वळू या. हे संख्येने साधारण एक कोटी आहेत. लहान मालकाला अनेक अडचणींना तोंड द्यावे लागते. तो करीत असलेली एकंदर उलाढाल कमी असते; त्याचा उत्पादन खर्च अधिक असतो. अधिक मोठ्या भांडवलदारांकडून होणाऱ्या किंमतीच्या बाबतीतील स्पर्धेत तगून रहायचे तर मजुरांना काहीशी कमी मजुरी देणे आणि कमी नफा पत्करणे हा एकमेव मार्ग त्याच्यापुढे असतो. अनेकदा हा नफा मॅनेजरला मिळणाऱ्या वेतनापेक्षा कमी असतो. लहान मालकांविरुद्ध लढा उभारून कामगार त्यांचा धंदा अधिक जलद बुडेल अशी परिस्थिती घडवून आणतात. मार्क्स ह्या लहान मालकांचे प्रतिगामी असे वर्णन करतो. कारण आपली लहान उत्पादनकेंद्रे तगवून धरण्याचा प्रयत्न करून ते इतिहासाची चक्रे उलटी फिरवू पहात असतात. असा विचार केला तर लहान मालकांविरुद्ध उभारण्यात येणारी कामगार-चळवळ पुरोगामी असते असे म्हटले पाहिजे. आपण लवकरच असे पाहू की लहान मालक बुडतील आणि मोठे भांडवलदार त्यांचे धंदे चालवायला घेतील ही परिस्थिती कामगारांना जी अधिक पसंत असते त्याची काही स्वतंत्र आणि लगतची कारणे असतात.

शेवटी, अधिक मोठ्या कारखान्यांविरुद्ध, बुर्ज्वाझीविरुद्ध जो कामगारवर्गाचा लढा आहे त्याच्याकडे आपण येऊन ठेपतो. कामगारवर्गाचा लढा सर्वत्र हेच स्वरूप धारण करील असे मार्क्सचे भविष्याविषयीचे दर्शन होते. आजघडीला भारतात हा लढा कामगारवर्गाच्या २५ टक्क्याहून कमी

विभागापुरता मर्यादित आहे आणि सबंध कामगार-वर्गाच्या वेतनासाठी काम करणाऱ्यांची जी एकंदर संख्या आहे तिच्या सुमारे एक षष्ठांश आहे. तेव्हा हा लढा म्हणजे स्वरूपतः एका लहान अल्पसंख्येने उभारलेले आंदोलन आहे, मार्क्सची कल्पना होती त्याप्रमाणे प्रचंड बहुसंख्येचे ते आंदोलन नाही. ह्या परिस्थितीमुळे मार्क्सने ह्या आंदोलनाच्या स्वरूपा-विषयी जो सिद्धांत मांडलेला आहे त्याहून त्याला एक वेगळे स्वरूप प्राप्त झालेले आहे हे मी पुढे दाखवून देईन.

सध्या मला, ह्या लढ्याचे जे एक लक्षणीय वैशिष्ट्य आहे त्याच्याकडे लक्ष वेधायचे आहे. हे वैशिष्ट्य असे की हा लढा जेवढ्या अधिक मोठ्या आस्था-पनाविरुद्ध ( establishment ) चालतो तितका तो अधिक यशस्वी ठरतो असे दिसून येते. दुसऱ्या शब्दांत ही गोष्ट मांडायची तर, ज्या प्रमाणात बुर्ज्वाझीचे मक्तेदारी बळ वाढते त्या प्रमाणात मालकांविरुद्ध आपल्या सामूहिक मागण्या रेटायचे कामगारांचे बळही वाढते. मार्क्सला हे स्वच्छपणे दिसले होते आणि म्हणून बुर्ज्वाझी आपलेच थडगे खणणाऱ्यांना निर्माण करते असे त्याने म्हटले आहे. पण पूर्णपणे स्पर्धात्मक असलेल्या अर्थव्यवस्थेच्या मॉडेलशी त्याचा विचार जखडलेला राहिल्याने कामगारवर्गाचा लढा मक्तेदाराविरुद्ध जो अधिक यशस्वी होतो त्याच्या मागच्या आधारभूत कारणाची स्वच्छ कल्पना त्याला आली नाही. हे कारण असे की आपला खर्च गिऱ्हाईकांकडे संक्रांत करणे मक्तेदाराला अधिक सोपे असते.ह्यामुळे लहान कारखान्यातील कामगारांपेक्षा अधिक मोठ्या कारखान्यातील कामगारांना अधिक वेतन आणि कामासंबंधीच्या अधिक चांगल्या अटी मिळविणे अधिक सुलभ ठरते. उदा. पुण्याच्या आसपास जे इंजिनिअरिंगचे उद्योगधंदे चालतात त्यातील लहान कारखान्यांना आपल्या कामगारांना कायद्याने ठरलेले किमान वेतनही देणे अवघड जाते पण अधिक मोठ्या कारखान्यातील कामगार कायदेशीर किमान वेतनाच्या दुप्पट वेतनाहून अधिक वेतन मिळवू शकतात. तेव्हा लहान कारखान्यातील कामगारांना आपला मालक बुडत जावा आणि त्याचा धंदा मोठ्या भांडवलदाराने आपल्या कबजात घ्यावा हे एकंदरीत पसंत पडले, तर त्यात नवल नाही. निदान एवढे म्हणता येईल की असे काही घडले, तर त्याचे त्यांना फारसे सोयरसुतक असल्याचे आढळून येत नाही. अखेरीस हा मार्क्सला दिसलेला इतिहासाचा क्रम आहे.

पण ह्यापासून काही गंभीर निष्कर्ष निष्पन्न होतात. ह्याचा अर्थ असा की कामगारवर्ग हा एक वर्ग म्हणून एकजिनसी नसतो. त्याच्यामध्ये काही उच्चनीच स्तर असतात, कमी अधिक प्रतिष्ठा अस-लेले काही गट असतात म्हणूनच केवळ नव्हे. हे तर आहेच, पण शिवाय लहान कारखान्यातील कामगारां-पेक्षा मोठ्या कारखान्यातील कामगारांची आपल्या मागण्या रेटण्याची ताकद स्वभावतःच अधिक असते. ती स्वभावतः अधिक असते असे मी जे म्हणतो त्याचे कारण असे की अधिक मोठ्या कारखान्यातील कामगारांची आपल्या मागण्या रेटण्याची ही श्रेष्ठ ताकद ते अधिक चांगल्या प्रकारे संघटित झालेले असतात म्हणून किंवा त्यांच्या ठिकाणी राजकीय कौशल्य अधिक असते म्हणून केवळ त्यांना लाभलेली नसते. त्याचे कारण एवढेच की त्यांना ज्या माल-काला तोंड द्यावे लागते त्याला मक्तेदारी सर्वाधि-कार असतो किंवा अल्पाधिकार असतो आणि आपल्या धंद्यात त्याला तो विकत असलेल्या मालाच्या किमतीच्या बाबतीत स्पर्धा सहन करावी लागत नाही. तेव्हा तो आपल्या कामगारांना अधिक वेतन देऊ शकतो आणि वाढलेला उत्पादनखर्च गिऱ्हाइका-कडे सहजी संक्रांत करू शकतो. ह्याला कामगाराचा आक्षेप नसतो. ह्या प्रकारातील वस्तुस्थिती अशी आहे की मोठ्या कारखान्यातील कामगार, वर्ग-लढ्याच्या बुरख्याखाली मक्तेदारी भांडवलदाराशी हातमिळवणी करतात आणि मक्तेदारीतून होणाऱ्या नफ्यातील आपला हिस्सा उचलतात.

ह्यामुळे वर्गलढ्याचे मार्क्सप्रणीत जे डायालेक्टिक आहे त्याच्या मुळावरच आघात होतो. मार्क्सने ह्या डायालेक्टिकची मांडणी अशी केली आहे :

"कामगारवर्ग आणि संपत्ती हे परस्परविरोधी ध्रुव आहेत ; ( परस्परांवर अवलंबून असलेल्या आणि परस्परांशी असलेल्या विरोधाच्या ताणातून स्वतःला टिकवून धरणाऱ्या ) ह्या दोन ध्रुवांचा मिळन एक सबंध बनतो."

अनुक्रमणिका

" खाजगी मालमत्तेला खाजगी मालमत्ता म्हणून, संपत्ती म्हणून स्वतःचे अस्तित्व टिकवून धरावे लागते आणि ह्यातूनच आपल्या विरोधी ध्रुवाचे, कामगारवर्गाचे अस्तित्व टिकवून धरावे लागते. ही ह्या विग्रहाची (antithesis) भावात्मक बाजू."

"ह्याच्या उलट कामगारवर्गाला, कामगारवर्ग म्हणून स्वतःच्या अस्तित्वाचे विसर्जन करणे भाग असते आणि ह्यातून आपला जो विरोधी ध्रुव आहे, आपल्या अस्तित्वाची अट असलेला, आपल्याला कामगारवर्ग बनविणारा जो विरोधी ध्रुव आहे, म्हणजे खाजगी मालमत्ता, त्याचे विसर्जन करावे लागते. ही ह्या विग्रहाची अभावात्मक बाजू."

जेथे मक्तेदारी भांडवल आणि मक्तेदारी कामगारवर्ग असतो अशा परिस्थितीत चालणाऱ्या वर्ग–कलहाला जे स्वरूप प्राप्त झालेले असते ते पाहिले तर कामगारवर्गाला कामगारवर्ग म्हणून स्वतःच्या अस्तित्वाचे विसर्जन करणे भाग का वाटावे हे मला कळत नाही. कलहानंतर हे पक्ष एकत्र येतात आणि सामायिक लाभातील आपापला हिस्सा उचलतात. खाजगी क्षेत्रातील संघटित कामगारांविषयी हे म्हणणे जर सत्य असेल तर सार्वजनिक क्षेत्रातील कामगारांविषयी ते अधिकच सत्य असते. तेथे कामगारांची मक्तेदारी असते आणि त्यांना तोंड द्यायचे असते ते राज्यसरकारला आणि राज्यसरकारकडेही पूर्ण मक्तेदारी असते, जो काही अधिक खर्च पडेल तो लोकांकडे सहजच संक्रांत करता येईल अशी सोय असते. मार्क्सने असे म्हटले आहे की " आधुनिक राज्याचे जे सरकार असते ती म्हणजे केवळ बुर्ज्वाझीचे जे सामायिक व्यवहार असतात त्यांचे व्यव–स्थापन करणारी समिती असते." मक्तेदार भांडवलाचा उदय झाल्यानंतर मक्तेदार कामगार-वर्गाचे काही प्रतिनिधी राज्याच्या सरकारात प्रविष्ट करून घेणे बुर्ज्वाझीला शक्य होते आणि शहाणपणाचे वाटते. हे सरकार आता मक्तेदारी भांडवल आणि मक्तेदारी कामगारवर्ग ह्या दोहोंच्या सामायिक व्यवहारांची व्यवस्था पाहते.

कामगारवर्गाला स्वतःच्या अस्तित्वाचे विसर्जन करणे भाग पडते ह्याचे स्पष्टीकरण देताना मार्क्सने असे म्हटले आहे की, " आतापर्यंत होऊन गेलेल्या ज्या वर्गांना आपला वरचष्मा प्रस्थापित करता आला त्या सर्वांनी ज्या व्यवस्थेला अनुसरून त्यांना इतरांचे शोषण करता येत होते ती व्यवस्था सर्वसाधारण समाजावर लादून स्वतःसाठी प्राप्त करून घेतलेल्या स्थानाला बळकटी आणली. कामगारवर्ग जर समाजाच्या उत्पादक शक्तींचा स्वामी बनायचा असेल, तर त्याचे पूर्वी ज्या प्रकारे शोषण होत होते तो प्रकार संपुष्टात आणूनच तो असा स्वामी बनू शकतो, आणि शोषणाचा हा प्रकार संपुष्टात आणून तो पूर्वीचे इतर सर्व शोषणप्रकारही संपुष्टात आणतो. कामगारांना स्वतःचे असे काही साधायचे किंवा बळकट करायचे नसते; वैयक्तिक मालमत्तेची राखण करणाऱ्या, तिच्या सुरक्षिततेची हमी देणाऱ्या पूर्वीच्या सर्व व्यवस्था नष्ट करणे हे त्यांचे (इतिहास-दत्त) कार्य आहे."

जेथे राज्यसरकारची किंवा खाजगी मक्तेदारी भांडवलशाही असते त्या परिस्थितीत हे खरे असत नाही. ह्या परिस्थितीत मक्तेदार कामगारवर्ग समाजाच्या उत्पादनशक्तींचे आपण अगदी स्वामी बनलो नाही तरी सहस्वामी तरी बनू अशी काळजी घेतो. ह्यासाठी त्याला ज्या प्रकारे त्याचे स्वतःचे किंवा इतर कुणाचे शोषण होत असेल तो प्रकार संपुष्टात आणावा लागत नाही. राज्यसरकारी आणि खाजगी मक्तेदारी भांडवलशाहीची जी चौकट असते, तिच्या मर्यादातच त्याला हे सर्व साधता येते. शिवाय मक्तेदार कामगारवर्गाला स्वतःचे असे काही सुरक्षित राखायचे, दृढ करायचे असे काही नसते हे म्हणणेही खरे नाही. त्याला एक सुरक्षित अशी नोकरी असते, दर महिन्याच्या पहिल्या तारखेला काही एका किमान उत्पन्नाचे आश्वासन त्याला असते; आणि काही एक किमान उत्पादन त्याने केले पाहिजे, अमुक कामे त्याने पार पाडली पाहिजेत अशी कोणतीही विशिष्ट जबाबदारी त्याच्यावर नसते. त्याचे ( इतिहासदत्त ) कार्य म्हणजे ह्या उत्पन्नाचे प्रमाण आणि सुरक्षितता वाढविणे हे असते. मार्क्सने असे म्हटले आहे की "आतापर्यंत होऊन गेलेल्या ज्या वर्गांना स्वतःचा वरचष्मा प्रस्थापित करता आला त्या सर्वांनी, त्यांना इतरांचे शोषण ज्या व्यवस्थेला अनुसरून करता येत होते ती व्यवस्था सर्वसाधारण समाजावर लादून स्वतः-साठी आधीच प्राप्त करून घेतलेल्या स्थानाला

बळकटी आणली." मक्तेदार कामगारवर्ग ह्याला अपवाद नाही. स्वतःचा वरपगडा प्रस्थापित केल्यानंतर तो आता मक्तेदारी भांडवलशाहीशी संधान जुळवू पहात आहे आणि ज्या व्यवस्थेत तो इतरांचे शोषण करू शकतो ती व्यवस्था सर्वसाधारण समाजावर लादून स्वतःसाठी आधीच प्राप्त करून घेतलेल्या स्थानाला बळकटी आणू पहात आहे. ह्यात त्याच्याशी सहकार्य करायला मक्तेदारी भांडवल स्वाभाविकपणे तयार असते आणि स्वतःचे अस्तित्व राखायला असे करणे त्याला भागही आहे. मार्क्सच्याच शब्दात सांगायचे तर भांडवल आणि कामगारवर्ग ह्यांच्यामधील व्याघाताची ही भावरूप बाजू.

पण ह्या व्याघाताची जी अभावरूप बाजू आहे तिचे काय होते? ती अंतर्हित आणि सुप्त राहते, आणि ज्याच्या जिवावर मक्तेदारी भांडवल आणि मक्तेदारी कामगारवर्ग एकमेकांशी हात जुळवून आपल्या सामायिक लाभातील आपापला हिस्सा उचलू शकतात असा वर्ग जोपर्यंत अस्तित्वात असतो तोपर्यंत ती डोके वर काढीत नाही. ह्या शक्यतेची कल्पना मार्क्सला आली नाही कारण त्याचा सारा विचार खुल्या स्पर्धेच्या चौकटीत बंदिस्त राहिलेला आणि त्याची अशी समजूत होती की समाजाचे लवकरच बुर्ज्वाझी आणि कामगारवर्ग अशा दोन वर्गांत विभाजन होणार आहे, आणि इतर कोणताही वर्ग उरणार नाही; ज्याच्या जिवावर बुर्ज्वाझी आणि कामगारवर्ग एकत्र येऊन आपल्या सामायिक लाभातील आपला वाटा प्राप्त करून घेतील असा वर्ग उरणार नाही. वर्गकलहाचे जे मार्क्सप्रणीत डायालेक्टिक आहे ते ह्या समजुतीपासून निष्पन्न होते.

ज्या प्रकारची परिस्थिती प्रस्थापित होईल असा सिद्धांत मार्क्सने मांडला आहे तिच्याहून भारतातील परिस्थिती कितीतरी वेगळी आहे. ह्याचे एक कारण असे की येथे भांडवलशाहीचा विकास पुरता झालेला नाही. ह्यामुळे येथे एक मोठा वर्ग असा आहे– प्रत्यक्षात हा काम करणाऱ्या एकंदर लोकसंख्येच्या $\frac{5}{6}$ हून कमी नाही– की जो बुर्ज्वाझीही नाही किंवा कामगारवर्गातही समाविष्ट नाही आणि जो कामगारवर्गात बुडून जाण्यासाठी तिष्ठत आहे. पण राज्यसरकारी आणि खाजगी मक्तेदारी भांडवलाचा आणि संघटित कामगारांच्या मक्तेदारीचा उदय झाल्यामुळे ह्या प्रक्रियेला आवर पडला आहे; हे मक्तेदार इतरांनी संघटित कामगारवर्गात प्रवेश करण्यावर बंधने घालतात. ह्यामुळे ज्या परिस्थितीत बुर्ज्वाझी आणि कामगारवर्ग ह्यांना एकत्र येऊन उरलेल्या समाजाच्या जिवावर आपला सामायिक लाभ करून घेता येईल अशी परिस्थिती अस्तित्वात आहे आणि बराच काळ टिकून राहील.

एक गोष्ट मी वर स्पष्ट केली आहे. ती अशी की फक्त मक्तेदारी भांडवल, मग ती राज्यसरकारी मक्तेदारी असो किंवा खाजगी असो, आणि मक्तेदारी कामगार, म्हणजे संघटित कामगार हेच एकत्र येऊन सामायिक लाभात सहभागी होऊ शकतात. हा संघटित विभाग दोन कोटी कामकऱ्यांचा मिळून बनलेला आहे; म्हणजे एकंदर कामकऱ्यांच्या तो फक्त एक नवमांश आहे. तेव्हा एका बाजूला सरकारी किंवा खाजगी भांडवल आणि दुसऱ्या बाजूला संघटित कामगार ह्यांच्यामध्ये जो झगडा चालत असल्याचे वरकरणी दृश्य दिसते त्या झगडयामुळे एकंदर कामकऱ्यांच्या आठ–नवमांशाएवढया असलेल्या असंघटित बहुसंख्येचे शोषण होत असते. एक लहान अल्पसंख्य गट बऱ्याच मोठया समाजाचे शोषण करीत असल्यामुळे ही प्रक्रिया अदृश्यप्राय असते. पण ही एक खरीखुरी आणि निश्चितपणे अस्तित्वात असलेली प्रक्रिया आहे.

म्हणजे, आजच्या भारतीय समाजात मार्क्सला अभिप्रेत असलेला वर्गकलह हा संघटित आणि असंघटित विभागांमध्ये चालू असलेल्या अधिक मोठ्या कलहामध्ये सामावला गेला आहे. सार्वजनिक आणि खाजगी क्षेत्रांतील संघटित कामगार आणि खाजगी मक्तेदारी भांडवल ह्यांचा मिळून हा संघटित विभाग बनलेला आहे आणि सरकार म्हणजे ह्या विभागाच्या सामायिक व्यवहारांची व्यवस्था पाहणारी कार्यकारी समिती आहे. असंघटित विभाग हा जमीन कसणारे शेतकरी, शेतमजूर, कारागीर, हस्तकारागीर, नव्याने अस्तित्वात आलेले लहान उत्पादक, दुकानदार, इतर अनेक अल्प भांडवलावर धंदा करणारे लोक आणि शेवटी ह्यांच्या बरोबर कामावर अस-

अनुक्रमणिका

लेले असंघटित मजूर ह्यांचा मिळून बनलेला असतो.

ह्या दोन विभागांना मार्क्संच्या अर्थाने सामाजिक वर्ग म्हणता येईल का ? हा प्रश्न आपल्याला फिरून मार्क्सने विचारलेल्या आणि अनुत्तरित ठेवलेल्या प्रश्नाकडे घेऊन जातो ? सामाजिक वर्ग म्हणजे काय ? सामाजिक वर्ग हा कशामुळे सामाजिक वर्ग बनतो ? उत्पादनाच्या विकासातील विशिष्ट ऐतिहासिक टप्प्यांशी वर्गांचे अस्तित्व निगडित असते हे मार्क्सने स्पष्ट केले आहे. ज्या ऐतिहासिक अर्थव्यवस्थेवरून मार्क्सने आपले सैद्धान्तिक मॉडेल बनविले आहे ती म्हणजे त्याच्या वेळची ब्रिटिश अर्थव्यवस्था होय आणि पूर्ण स्पर्धा आणि खुला व्यापार ही ह्या अर्थव्यवस्थेच्या स्वरूपातच समाविष्ट असलेली अशी तिची कायम वैशिष्टये आहेत अशी त्याची समजूत झालेली होती. ह्या अर्थव्यवस्थेमध्ये दोन मूलभूत सामाजिक वर्गांची व्याख्या करणारा एक अतिशय योग्य असा निकष त्याला गवसला. आणि त्याने पुढे असा सिद्धांत मांडला की जसजसा ह्या व्यवस्थेचा विकास होत जाईल तसतसा समाज ह्या दोन वर्गांमध्ये अधिकाधिक दुभंगत जाईल : खाजगी मालमत्ता आणि उत्पादनाची साधने ह्यांचे मालक, आणि ज्यांच्याकडे मालमत्ता आणि उत्पादनाची साधने नाहीत असे इतर.

पण परिस्थिती बदलली आहे. स्पर्धा हे भांडवलशाहीचे तितकेसे वैशिष्टच आता राहिलेले नाही. सरकारी आणि खाजगी मक्तेदारी भांडवल आणि संघटित कामगारांची मक्तेदारी ही तिची आता वैशिष्टये बनली आहेत. ह्या व्यवस्थेमध्ये कोणते मूलभूत सामाजिक वर्ग आहेत हे ठरविण्यासाठी उत्पादनाच्या साधनांची मालकी हा निकष आता उपयोगी पडत नाही. मक्तेदारी भोगणारे आणि इतर ह्यांच्यामधील भेदावर आधारलेल्या एका नवीन निकषाच्या साहाय्याने आता सामाजिक वर्गांची व्याख्या करावी लागेल आणि त्यांच्यामधील भेद स्पष्ट करावे लागतील. हा निकष म्हणजे किंमत बनविणारे आणि किंमत स्वीकारणारे ह्यांच्यामधील भेद होय. मक्तेदारी भांडवल, सरकारी किंवा खाजगी मक्तेदारी भांडवल, ज्या वस्तूंचे उत्पादन करते त्यांची किंमत ते स्वतःच ठरविते. मक्तेदार कामगार स्वतःची किंमत स्वतःच ठरवितात. इतर सर्व ते उत्पादन करीत असलेल्या वस्तूंची किंवा त्यांच्या श्रमाची जी किंमत समाज ठरवेल ती पत्करतात. समाजाचे आता दोन वर्गांत विभाजन झाले आहे : किंमत बनविणारे आणि किंमत स्वीकारणारे.

ह्या दोन वर्गांमधील कलहाच्या मार्क्सवादी ‘ डायालेक्टिक’चे स्वरूप असे असल्यासारखे दिसते : किंमत बनविणारे आणि किंमत स्वीकारणारे हे दोन परस्परविरोधी ध्रुव आहेत; आणि म्हणूनच त्यांचा मिळून एक सबंध बनतो. प्रश्न असा की ह्या विग्रहात प्रत्येकाचे स्थान काय असते ?

किंमत बनविणाऱ्यांना स्वतःच्या अस्तित्वासाठी त्यांनी बनविलेल्या किंमती स्वीकारणाऱ्यांची आवश्यकता असते. ह्यामुळे स्वतःचे अस्तित्व टिकवून धरण्यासाठी किंमत बनविणाऱ्यांना किंमत स्वीकारणाऱ्यांचेही अस्तित्व टिकवून धरावे लागते. ही व्याघाताची भावनात्मक बाजू होय. किंमत स्वीकारणारे जे आहेत, म्हणजे शेतकरी, शेतमजूर, कारागीर, हातकारागीर, लहान उत्पादक, इ. मंडळी, त्यांचे संरक्षण करण्यासाठी शासकवर्ग जी अनेक धोरणे अंमलात आणीत आहे त्यांचा उलगडा ह्यामुळे होतो. कमाल जमीनधारणेच्या कायद्याने लहान प्रमाणावरील शेती टिकवून धरण्याचे धोरण, कारागिरांना आर्थिक साहाय्य आणि पाठिंबा देण्याचा करण्यात येणारा आविर्भाव आणि लहान उद्योगधंद्यांना बँकेकडून पतपुरवठा करून त्यांचे संवर्धन करण्याचा प्रयत्न ही अशा धोरणाची उदाहरणे आहेत. शासकवर्ग हे सर्व करतो पण एक गोष्ट करीत नाही. हे उत्पादक ज्या वस्तू उत्पादन करीत असतात त्यांची त्यांना अमुक एक किंमत मिळेल अशी हमी तो देत नाही आणि त्यांच्या कामगारांना अमुक एक वेतन मिळेल अशी हमी तो देत नाही.

शोषण आणि दारिद्र्य ह्यांपासून सुटका करून घेण्यासाठी किंमत स्वीकारणाऱ्यांना स्वतःचे, एक वर्ग म्हणून, विसर्जन केले पाहिजे, ते असे करतात पण स्वतःचा जो विरोधी वर्ग आहे, किंमत बनविणाऱ्यांचा वर्ग, त्याचे विसर्जन करून ते हे घडवून आणीत नाहीत. तर किंमत बनविणाऱ्यांच्या छावणीत

घुसून, त्यांच्यात मिसळून ते ही गोष्ट साधतात. ही ह्या व्याघाताची अभावरूप बाजू होय.

ह्या प्रक्रियेने बाळसे धरले आहे. शेतकरी, शेतमजूर, कारागीर, हातकारागीर, लहान उत्पादक आणि लहान व्यापारी असे जे सर्व किंमत स्वीकारणारे लोक आहेत ते आपापले धंदे सोडून देऊन संघटित विभागात वेतनावर काम मिळते का हे पाहण्याच्या खटपटीत आहेत; म्हणजे ते किंमत बनविणाऱ्यांत सामील होण्याच्या प्रयत्नात आहेत. त्यांचा जमिनीचा तुकडा आणि उत्पादनाची त्यांची अल्प साधने ह्याशिवाय त्यांच्याकडे गमवायला काहीच नाही. आणि त्यांना मिळविण्यासारखे काहीतरी आहे– त्यांना एक नोकरी मिळविता येईल; महिन्याच्या पहिल्या तारखेला निश्चित उत्पन्न देण्याची हमी देणारी नोकरी; पाऊस पडो, न पडो; त्यांनी काही उत्पादन केलेले असो, नसो; त्यांनी उत्पादन केलेल्या वस्तू विकल्या जात असोत, नसोत, त्यांना महिन्याच्या पहिल्या तारखेला निश्चित उत्पन्न देणारी नोकरी त्यांना मिळविता येईल. किंमत बनविणारे किंमत स्वीकारणाऱ्यांचे करीत असलेले शोषण जसजसे वाढत जाईल, तसतशी ह्या दोहोंमधील दरी रुंदावत जाईल, वरील स्थलांतराला वेग चढेल. किंमत बनविणाऱ्यांचा वर्ग एक विशिष्ट 'क्रिटिकल' प्रमाण गाठेपर्यंत हे घडून येत राहील. मग, प्रत्येकाने किंमत बनविणारा, बनण्याचा प्रयत्न करण्यात जो अंगभूत अंतर्विरोध आहे तो प्रकट होईल आणि ही सबंध व्यवस्था जमिनीवर कोसळेल. त्यानंतर काय होईल ह्याचे भविष्य एखाद्या प्रेषितासारखे मी वर्तवू गेलो तर ते विनयाला सोडून होईल.

## पुनर्विधान :

माझा प्रयत्न आजच्या भारतीय समाजातील वर्गकलहाचे मार्क्सवादी चौकटीत विश्लेषण करण्याचा आहे; अर्थात् मार्क्सने लिहिल्यानंतर भांडवलशाहीचा विकास प्रत्यक्षात ज्या मार्गाने आणि स्वरूपात झाला त्यांची दखल घेऊन जिच्यात आवश्यक तेथे बदल केलेला आहे अशा मार्क्सवादी चौकटीत हे विश्लेषण करायचे आहे. भांडवलशाहीचा विकास ज्या दिशेने होईल अशी मार्क्सची अपेक्षा होती, नेमक्या त्याच दिशेने तिचा विकास झालेला नाही हे उघड आहे. मार्क्सने दिग्दर्शित केलेली दिशा आणि प्रत्यक्षात अनुसरली गेलेली दिशा यांच्यात अनेक ठिकाणी भेद आहेत. मार्क्सने जे निष्कर्ष काढले आहेत त्यांतील कित्येक अत्यंत महत्त्वाच्या निष्कर्षांत ज्यांच्यामुळे बदल करावा लागेल असे मला वाटते अशा ह्या काही महत्त्वाच्या भेदांवर लक्ष केंद्रित करण्याचा मी प्रयत्न केला आहे. त्यांचा संक्षेपाने परत निर्देश करतो.

पहिला भेद असा सामान्यपणे पाहता भांडवलशाहीच्या विकासामुळे समाजाची दोन अगदी भिन्न आणि परस्परविरोधी वर्गांत विभागणी घडून आलेली नाही. भांडवलशाहीपूर्व समाजातील कित्येक मध्यमवर्गीय गट– उदा. दुकानदार– तगून राहिलेले आहेत आणि कित्येक नवीन मध्यमवर्गीय गटांचा– उदा. नवीन व्यावसायिक गटांचा उद्भव झाला आहे. दुसरी गोष्ट अशी की भांडवलशाहीच्या विकासामुळे कामगारवर्गाला ( proletariat ) ज्यांना अगदी साधी कौशल्ये पुरेशी असतात अशा कामकऱ्यांचा एकजिनसी वर्ग हे अवनत स्वरूप प्राप्त झालेले नाही. उलट, कामकऱ्यांच्या दलामध्ये कौशल्ये आणि अनुभव ह्यांमधील भेदांवर आधारलेली एक श्रेणी ( hierarchy ) ह्या विकासामुळे निर्माण झाली आहे; कौशल्याने आणि अनुभवाने श्रेष्ठ असणाऱ्यांना पारितोषिक म्हणून अधिक वेतन आणि वरचा दर्जा देण्यात येतो. शिवाय, बुर्ज्वाझी आणि कामगारवर्ग यांच्या दरम्यान व्यावसायिक व्यवस्थापकांचा एक वर्ग अस्तित्वात आला आहे. त्याची स्वतःची एक श्रेणी आहे. त्याच्या शिखराचा भाग बुर्ज्वाझीशी एकजीव झालेला असतो आणि तळचा भाग कामगारवर्गाच्या श्रेणीच्या शिखराशी एकजीव झालेला असतो. आता तिसरा मुद्दा. भांडवलशाहीचा विकास अर्थव्यवस्थेच्या सर्व विभागांत समगतीने झालेला नाही. मक्तेदारी भांडवलशाही हा भांडवलशाहीच्या विकासाचा सर्वोच्च बिंदू असे जर मानले, तर ह्या बाबतीत वेगवेगळ्या उद्योगधंद्यांत किंवा वेगवेगळ्या विभागांत खूपच फरक दिसून येतो. दुसऱ्या शब्दांत ही गोष्ट मांडायची तर असे म्हणता येईल की बुर्ज्वाझी हाही एकजिनसी वर्ग नव्हे. चवथी गोष्ट अशी की भांडवलशाही अर्थव्यवस्थेमध्ये राज्यसरकारने हे राष्ट्रीयीकृत किंवा सरकारी मालकीच्या

उद्योगधंद्यांच्या क्षेत्रात, लोकांना सोयी उपलब्ध करून देणाऱ्या किंवा कल्याणकारी सेवांच्या क्षेत्रात आणि प्रशासनाच्या क्षेत्रात एक मोठा मालक —लोकांना वेतन देऊन कामावर ठेवणारा मालक —म्हणून प्रवेश केला आहे. ह्यामुळे कामगारवर्गाच्या आंदोलनात काहीशी गुंतागुंत निर्माण झाली आहे. बुर्झ्वाझी आणि सरकार ह्यांच्यांत मालक म्हणून भेद आहे ही गोष्ट ध्यानात न घेणे अवास्तव ठरेल; पण त्यांच्यातील भेद ध्यानात घेतला तर त्यामुळे कामगारवर्गाचे विभाजन घडून येते. शेवटचा मुद्दा. कामगारवर्गात जे अंतर्गत भेद आहेत ते खाजगी क्षेत्र आणि सार्वजनिक क्षेत्र ही शेजारीशेजारी नांदतात ह्यामुळे केवळ निर्माण झालेले नाहीत; बुर्झ्वाझीमध्येच अंतर्गत भेद आहेत म्हणूनही ते निर्माण झाले आहेत. कामगारसंघटनांमधून संघटित झालेले कामगार जेव्हा अधिक मोठ्या मालकांशी मुकाबला करीत असतात, अधिक मक्तेदारीबळ असलेल्या खाजगी किंवा सरकारी मालकांशी मुकाबला करीत असतात तेव्हा ते अधिक यशस्वी होत असतात असे दिसून येते. ह्यामुळे प्रत्येक उद्योगधंद्यातील किंवा विस्थापनेतील (establishment) कामगार, कामगारवर्गाच्या एकीच्या नावाखाली सबंध कामगारवर्गाकडून मिळालेल्या सर्वसाधारण पाठिंब्याचा टिळा लावून मग 'एकला चलो' ह्या मार्गाचा अवलंब करणे पसंत करतात. हे आपल्या सोयीचे आहे असेच बूर्झ्वाझीला आढळून आले आहे. त्याने कामगारांच्या हक्कांना कायदेशीर मान्यता दिली आहे. एवढेच नव्हे, तर त्यांच्या हितसंबंधांना वेगवेगळ्या प्रमाणात प्रतिनिधित्व देऊन त्यांना सरकारात सामावून घेतले आहे. ह्याचा परिणाम असा झाला आहे की कामगार बुर्झ्वाझीपुढे क्रांतिकारक सामन्यासाठी ठाण मांडेल अशा एका राजकीय पक्षात स्वतःला संघटित करतील अशी जी मार्क्सची अपेक्षा होती तिच्याऐवजी भांडवलशाहीशी करारमदार करणे, समझौता स्थापन करणे पसंत केले आहे आणि ही गोष्ट नाकबूल करण्याचा त्यांनी कितीही प्रयत्न केला तरी ही रणनीती त्यांना एकंदरीत लाभदायक ठरली आहे.

कामात गुंतलेल्या लोकसंख्येच्या मानाने पाहता भारतात फक्त जवळजवळ १० टक्के अर्थव्यवस्थेने भांडवलशाही विकास साधून घेतला आहे. ह्यातील ४० टक्के सार्वजनिक मालकीखाली आणि व्यवस्थापनाखाली आहे आणि ६० टक्के खाजगी मालकीखाली आणि व्यवस्थापनाखाली आहे. ह्याचा अर्थव्यवस्थेचा संघटित विभाग असा निर्देश करण्यात येतो. ह्या विभागात भांडवलशाही विकासाच्या इतर वैशिष्टयांप्रमाणे मार्क्सप्रणीत वर्गकलहही, वर वर्णन केल्याप्रमाणे काहीशा बदललेल्या स्वरूपात, आढळून येतो. आता माझा प्रश्न असा आहे: ह्या वर्गकलहाचा उरलेल्या असंघटित, मूलतः भांडवलशाहीपूर्व स्वरूपाच्या ९० टक्के विभागावर काय परिणाम घडून येतो? माझे म्हणणे असे आहे की ह्या कलहाची उद्दिष्टे काही असोत आणि त्याचे भासमान स्वरूप काही असो, त्याचा परिणाम म्हणून संघटित विभागाकडून असंघटित विभागाचे शोषण घडून येते.

एक गोष्ट मला स्पष्ट केली पाहिजे. संघटित विभाग असंघटित विभागाचे शोषण करतो असे मी म्हणतो तेव्हा संघटित विभागामध्ये किंवा असंघटित विभागामध्ये शोषण नसते असे मला म्हणायचे नाही; किंवा सूचितही करायचे नाही. प्रत्येक विभागात अंतर्गत शोषण असू शकते आणि तरीही एक विभाग दुसऱ्याचे शोषण करू शकतो. उदाहरणादाखल, जेव्हा एक साम्राज्यशाही देश आपल्या वसाहतीचे शोषण करतो तेव्हा अशीच परिस्थिती असते. साम्राज्यशाही देशात अंतर्गत शोषण असते आणि वसाहतीतही अंतर्गत शोषण असते. तथापि साम्राज्यशाही देश वसाहतीचे शोषण करीत असतो आणि करताना साम्राज्यशाही देशातील परस्परविरोधी वर्ग आपले समान उद्दिष्ट साधण्यासाठी एकत्र येतात. हे ह्या प्रकारच्या घटनेचे सार आहे.

एक टीका अशी की संघटित विभाग आणि असंघटित विभाग, किंवा ज्यांना मी किंमत बनविणारे आणि किंमत स्वीकारणारे असे म्हटले आहे ते, मार्क्सच्या अर्थाने, वर्ग नव्हत. आता ते असतील किंवा नसतील. पण येथे हितसंबंधांचे दोन भिन्न गट आहेत आणि एक दुसऱ्याचे शोषण करतो ही वस्तुस्थिती जर मान्य करण्यात आली तर शब्दांविषयी भांडण्यात मला काही प्रयोजन नाही. समाजाची, किंमत बनविणारे आणि किंमत स्वीकारणारे, ह्या दोन वर्गांत मी

अनुक्रमणिका

जी विभागणी केली आहे ती मार्क्सप्रणीत वर्गांशी असलेले त्यांचे साम्य दाखवून देण्यासाठी आणि वर्गांची व्याख्या करण्यासाठी मी जो वेगळा निकष सुचवीत आहे त्यावर भर देण्यासाठी केली आहे. माझी विनंती अशी आहे की भांडवलशाहीच्या विकासाचा आजचा जो टप्पा आहे त्याच्या संदर्भात ज्याच्या आधारे वर्गावर्गांमध्ये भेद करावा लागेल तो निकष म्हणजे उत्पादनसाधनांची मालकी हा असू नये; तर स्वतः किंमत ठरवून तिचा आदेश समाजाला करायची क्षमता हा तो निकष असावा. ह्या आधारे पाहता मी येथे केवळ दोन वर्ग मानीत नाही, अनेक वर्गांची श्रेणी आहे असे मी मानतो; ह्या श्रेणीतील एक वर्ग दुसऱ्यापेक्षा अधिक संघटित असतो, म्हणजे त्याच्यात भांडवलशाहीचा अधिक विकास झालेला असतो; त्याचे मक्तेदारीचे बळ दुसऱ्यापेक्षा अधिक असते आणि म्हणून स्वतःच्या किंमतींचा इतरांना आदेश करायची त्याची ताकद अधिक असते. माझे म्हणणे असे आहे की अशा श्रेणीबद्ध समाजात प्रत्येक वर्ग आपल्यापेक्षा कमी संघटित वर्गाचे शोषण करीत असतो आणि शोषणाच्या ह्या प्रक्रियेत त्या वर्गातील भांडवलदार आणि कामगार आपल्या समान उद्दिष्टासाठी एकवटतात.

ह्याला पुरावा काय ? विशेषतः अधिक संघटित विभागातील कामगारवर्ग कमी संघटित विभागातील कामगारांचे शोषण करण्याच्या प्रक्रियेत सहभागी होतो ह्याचा पुरावा काय ? ह्या संधीचा फायदा घेऊन ह्याचा उदाहरणादाखल म्हणून काही पुरावा मी सादर करतो.

एक सरळ उदाहरण घ्यायचे म्हणून फक्त वस्तूंचे उत्पादन करणाऱ्या उद्योगधंद्यांचा (manufacturing industry ) विचार करू या. ह्यांची तीन विभागात स्वच्छ विभागणी करता येईल. ह्या तीन विभागांत भांडवली विकासाच्या तीन पायऱ्या दिसून येतात. हे विभाग म्हणजे, (१) नोंदलेल्या ( registered) कारखान्यांचा विभाग; (२) न नोंदलेल्या शहरी कारखान्यांचा विभाग; आणि (३) न नोंदलेल्या ग्रामीण कारखान्यांचा विभाग. पुढे ह्या तीन विभागांविषयीचे काही संबंधित आकडे आणि प्रमाणे दिली आहेत. (१९७४–७५ ह्या वर्षातली).



वस्तूंचे उत्पादन करणारे उद्योगधंदे (१९७४–७५)

| | नोंदलेले | न नोंदलेले शहरी | न नोंदलेले ग्रामीण |
|---|---|---|---|
| नोकर (लक्षांमध्ये) | ५६ | ४७ | १०८ |
| वेतन कामगार (लक्षांमध्ये) | ४४ | १० | ८ |
| दर नोकरामागे स्थिर भांडवल ( रु. ) | १२,१०० | १,४४९ | ६०१ |
| दर नोकरामागे भर घातलेले मूल्य (रु.) | ११,३८९ | २,५७९ | ९३२ |
| दर कामगाराची वार्षिक मजुरी (रु.) | ३,८३१ | १,५५१ | ८२२ |

माहितीचा उगम : Statistics of the Unorganised Sector (असंघटितविभागाची आकडेवारी )
Central Statistical Organisation ( मध्यवर्ती संख्याशास्त्रीय संघटन ) मद्रास येथे मे २५-२६-१९७८ रोजी भारतीय अर्थव्यवस्थेचे संख्याशास्त्रीय अधिष्ठान ह्या विषयावर भरलेल्या पाचव्या विचारगोष्ठीला सादर करण्यात आलेला निबंध.

प्रथम लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी : ह्या तीन विभागांत भांडवली विकास तीन पायऱ्यांपर्यंत झाला आहे. पुढील दोन वैशिष्टयांच्या आधारे हे भेद स्पष्ट करता येतात. अ) प्रत्येक नोकरामागे असलेले स्थिर भांडवल; आणि ब) सर्व नोकरांमध्ये असलेले मजुरी-कामगारांचे प्रमाण. नोंदलेल्या कारखान्यांचा विभाग हा भांडवली विकासाच्या दृष्टीने सर्वांत पुढे आहे. ह्याच्यात मजुरीकामगार हे एकूण कर्मचाऱ्यांच्या ८० टक्के आहेत आणि दर कर्मचाऱ्यामागे स्थिर भांडवल रु. १२,१०० एवढे आहे. न नोंदलेल्या शहरी विभागात मजुरी-कामगार एकूण कर्मचाऱ्यांच्या २० टक्क्याहून थोडेसेच अधिक आहेत आणि दर कर्मचाऱ्यामागे असलेले भांडबल रु. १४४९ एवढे आहे. न नोंदलेला ग्रामीण विभाग जवळजवळ भांडवलशाहीपूर्व अवस्थेत आहे, मजुरी-कामगार एकूण कर्मचाऱ्यांच्या केवळ ७.५ टक्के एवढे आहेत आणि दर कर्मचाऱ्यामागे फक्त रु. ६०१ एवढे भांडवल आहे.

अनुक्रमणिका






आता ह्या तीन विभागांत कामगारांना मिळणाऱ्या सरासरी वार्षिक मजुरीची तुलना करूया. नोंदलेल्या कारखान्यांच्या विभागात मिळणाऱ्या रु. ३८३१ पासून तो न नोंदलेल्या शहरी विभागात मिळणाऱ्या रु. १५५१ पर्यंत, तो न नोंदलेल्या ग्रामीण विभागात मिळणाऱ्या रु. ८२२ पर्यंत एवढे भेद येथे आहेत. म्हणजे न नोंदलेल्या शहरी विभागात मिळणारी मजुरी न नोंदलेल्या ग्रामीण विभागात मिळणाऱ्या मजुरीच्या जवळजवळ दुप्पट असते आणि नोंदलेल्या विभागातील मजुरी न नोंदलेल्या शहरी विभागातील मजुरीच्या जवळजवळ अडीचपट असते. तेव्हा ज्या विभागात भांडवली विकास अधिक झालेला असतो त्या विभागात कामगारांना अधिक मजुरी मिळते हे स्पष्ट आहे. पण ह्याचा उलगडा करणे आवश्यक आहे.

आता अनेकांना एका गोष्टीकडे तावडतोब लक्ष वेधावेसे वाटेल. ती गोष्ट अशी की ज्या विभागात भांडवली विकास अधिक झालेला आहे त्याच्यात प्रत्येक कर्मचाऱ्यामागे मूल्यात घालण्यात येणारी भरही तुलनेने अधिक आहे. ही गोष्ट अगदी खरी आहे. किंबहुना प्रत्येक मजुरी–कामगाराला मिळणारी मजुरी आणि प्रत्येक कर्मचाऱ्यामागे मूल्यात घालण्यात येणारी भर यांची तुलना केली तर असेच आढळून येते की एखाद्या विभागात भांडवली विकास जितका जास्त झालेला असतो तितके त्याच्यात मजुरी–कामगाराला मिळणाऱ्या मजुरीचे, दर कर्मचाऱ्याकडून मूल्यात घातल्या जाणाऱ्या भरीशी असलेले प्रमाण कमी असते. नोंदलेल्या विभागात दरडोई मजुरी दर कर्मचाऱ्याने मूल्यात घातलेल्या भरीच्या फक्त ३३.६ टक्के असते, तर ती न नोंदलेल्या शहरी विभागात ६६ टक्के असते आणि न नोंदलेल्या ग्रामीण विभागात ८८.२ टक्के एवढी असते. ह्या तीन विभागात भांडवली विकास पायरी-पायरीने अधिक झालेला आहे आणि शोषणाच्या मार्क्सप्रणीत संकल्पनेच्या दृष्टीने पाहता भांडवली विकासाच्या अधिक उच्च अवस्थेत मजुरी–कामगाराचे शोषणही अधिक होत असे, हे स्वच्छपणे दिसून येते. तरीसुद्धा भांडवली विकासाबरोबर मजुरी–कामगाराला अधिक मजुरी मिळत जाते ही वस्तुस्थिती आहे आणि तिचा उलगडा अजून व्हायचा आहे.

आता असा युक्तिवाद करण्यात येईल की दर कर्मचाऱ्यांमागे मूल्यात जी भर पडते तिच्यावरून त्या त्या विभागात श्रमाची उत्पादकता किती आहे हे दिसून येते. अधिक भांडवली विकास झालेल्या विभागात ही उत्पादकता अधिक असते आणि ह्या योगे त्या विभागात जी अधिक मजुरी मिळते तिचा उलगडा होतो. पण हा युक्तिवाद मार्क्सवादी नाही, तो मार्क्सवादाला अगदी सोडून आहे हे स्पष्ट आहे. ज्याच्यात भांडवली विकास अधिक झालेला असतो अशा विभागात मिळणाऱ्या अधिक मजुरीचे समर्थन मार्क्सवादी विश्लेषणाला अनुसरून करायचे असेल, तर त्या विभागात जे श्रमिक काम करतात त्यांचा ‘ उत्पादन खर्च ’ कमी विकसित विभागात काम करणाऱ्या श्रमिकांच्या ‘ उत्पादन खर्चा ’पेक्षा अधिक असतो असे दाखवून द्यावे लागेल. पण हा उत्पादन खर्च अधिक असतो हे मार्क्स मान्य करीत नाही. मार्क्सच्या म्हणण्याप्रमाणे भांडवलशाही विकासामुळे कामगार हा यंत्राचे केवळ एक उपांग बनतो आणि त्याच्या निर्मितीचा खर्च त्याची केवळ जीवधारणा होण्यासाठी जी साधनसामग्री आवश्यक असते तिच्या उत्पादन खर्चाएवढा काय तो असतो. मार्क्सचे हे म्हणणे चूक आहे, आधुनिक औद्योगिक कामगाराला अनेक विशेष कौशल्ये कमवावी लागतात आणि ही कौशल्ये प्रामुख्याने प्रत्यक्ष उत्पादनाच्या जागी अनेक वर्षांचे ट्रेनिंग घेऊनच कमावता येतात असा युक्तिवाद मी केला आहे. कामगारांना कामावर ठेवणारे मालक ही गोष्ट ओळखतात आणि एखादा अनुभवी कामगार गमवून, नवीन कामगाराला सुरवातीपासूनचे शिक्षण देण्यापेक्षा त्या अनुभवी कामगाराला अधिक वेतन द्यायची त्यांची तयारी असते. पण आता दोन प्रश्न उपस्थित होतात. एक असा की हे बरेचसे ट्रेनिंग सार्वजनिक खर्चाने होते आणि त्याबद्दल कामगाराची भरपाई आपण करावी का ? दुसरा प्रश्न असा की समजा हे ट्रेनिंग कामगाराने स्वतःच्या खाजगी खर्चाने घेतलेले आहे. मग त्या कामगाराने स्वतःमध्ये हे जे ‘ भांडवल गुंतविलेले ’ आहे त्याच्यात आणि उत्पादन-साधनांच्या मालकीच्या स्वरूपातील खाजगी माल-

मत्तेत मूलतः फरक काय आहे ? उत्पादनसाधनांच्या मालकीबद्दल पारितोषिक मिळणे जर समर्थनीय नसेल तर कामगारामध्ये शिक्षण आणि ट्रेनिंगची जी गुंतवणूक करण्यात आलेली असते तिला लाभणाऱ्या पारितोषिकाचे समर्थन आपण कसे करणार ?

आता आपण एका अधिकच कठीण प्रश्नांशी येऊन ठेपतो. हा प्रश्न आपल्या विषयाच्या अगदी गाभ्याशी जाऊन भिडलेला आहे. अधिक विकसित विभागातील कामगार अधिक ट्रेन्ड असतात ह्याचा निर्देश आपण वर केलाच आहे. पण शिवाय ह्या विभागात दर कामगारामागे अधिक स्थिर भांडवल गुंतविलेले असते आणि ते पाठीशी घेऊन ते काम करीत असतात. ही अनुकूलता त्यांना असते. ह्या विभागात श्रमाची उत्पादकता जी अधिक असते-दर कामकऱ्यामागे मूल्यात तुलनेने जी अधिक भर पडत असते तिच्यात ती प्रतिबिंबित झालेली असते-ती ह्या विभागात श्रमाची अधिक स्थिर भांडवलाशी, अधिक यंत्रसामग्री आणि उपकरणे यांच्याशी, सांगड घातली जात असल्याने बह्वंशी निर्माण होत असते. भांडवलशाहीच्या विकासाचे जे मार्क्सवादी विश्लेषण आहे त्याचा केंद्रबिंदू असा की बुर्ज्वाझी भांडवलाचा संग्रह करीत जातो, त्याची श्रमाशी सांगड घालतो आणि श्रमाची उत्पादकता वाढवीत नेतो पण मजुरी-कामगाराला केवळ त्याच्या उपजीविकेपुरतेच देतो आणि अतिरिक्त मूल्य शोषून घेऊन त्याची भांडवलाच्या संग्रहात भर टाकतो. ह्याच्यात शोषण असते कारण जे सबंध मूल्य निर्माण झालेले असते ती श्रमाची निर्मिती असते; पण कामगाराला फक्त उपजीविकेपुरते मिळते आणि अधिक उरते ते बुर्ज्वाझी उचलतो.

बुर्ज्वाझीचा युक्तिवाद असा आहे की कामगार स्वतःच्या उपजीविकेला जेवढे पुरेल त्याच्याहून अधिक जे उत्पादन करतो ते त्याची स्थिर भांडवलाशी सांगड घालण्यात आलेली असते म्हणून करतो आणि म्हणून अतिरिक्त मूल्यावर उत्पादनसाधनांच्या मालकांची, म्हणजे बुर्ज्वाझीची, रास्त मालकी असते. आणि म्हणून बुर्ज्वाझी अतिरिक्त मूल्य जेव्हा कबजात घेतो तेव्हा तो कामगारांचे शोषण करीत नसतो. आता अधिक चांगल्या उत्पादनसाधनांच्या स्वरूपातील वाढीव स्थिर भांडवलामुळे श्रमाची उत्पादकता वाढते ही गोष्ट मार्क्स अमान्य करीत नाही. पण उत्पादनसाधनांचा घडत आणि वाढत आलेला जो संग्रह असतो त्याच्यावर कुणाची खाजगी मालकी असते असे मानण्याला तो आव्हान देतो. कारण ह्या संग्रहाचा उगमही कामगारांच्या श्रमाच्या निर्मितीतील जो भाग बुर्ज्वाझींनी अन्याय्यपणे हस्तगत केला होता त्याच्यात आहे. तेव्हा आज जे अतिरिक्त मूल्य निर्माण होत आहे ते उत्पादनसाधनांच्या घडलेल्या संग्रहामुळे निर्माण होत आहे हे म्हणणे योग्य असले, तरी अंतिम दृष्टीने पाहता ते कामगारांच्याच मालकीचे आहे. निर्माण करण्यात आलेले सर्व मूल्य ह्या अर्थाने श्रमाची निर्मिती असते.

मार्क्सच्या ह्या सिद्धांताचा अनेकदा चूक अर्थ लावण्यात येतो. आज चाललेल्या एखाद्या उद्योगधंद्यात जे मूल्य निर्माण होत असेल ते संबंध मूल्य म्हणजे आजच्या धंद्यात काम करीत असलेल्या कामगारांची निर्मिती असते आणि म्हणून ते रास्तपणे त्यांच्या मालकीचे असते असा अर्थ अनेकदा लावण्यात येतो, हे चूक आहे. कारण ह्यांच्यात असे अभिप्रेत आहे की त्या उद्योगधंद्यात आज वापरण्यात येणारी उत्पादनसाधने ही त्याच्यात आज काम करणाऱ्या कामगारांची निर्मिती आहे आणि म्हणून ती त्यांची मालमत्ता आहे. उत्पादनसाधनांवरील बुर्ज्वाझीची खाजगी मालकी मान्य करणे जितके मार्क्सवादाला सोडून आहे तितकेच हे म्हणणेही आहे; मार्क्सवादी सिद्धांताला अनुसरणारी योग्य भूमिका अशी की कामगारांच्या केवळ उपजीविकेसाठी आवश्यक असेल त्याहून जे अधिक मूल्य निर्माण करण्यात येते ते सर्व मूल्य ही उत्पादनसाधनात मूर्त झालेल्या भूतकालीन श्रमाची निर्मिती असते आणि म्हणून ती कामगारांच्या सबंध समुदायाच्या मालकीची असते. ह्यामुळे भांडवलाचा संग्रह करण्याकडे तिचा विनियोग करावा की उपजीविकेहून अधिक उपभोगासाठी करावा ही सामाजिक निर्णयाची बाब आहे. ती वेगवेगळ्या उद्योगधंद्यात गुंतलेल्या बुर्ज्वाझीने आणि कामगारांनी एकमेकांशी सौदा करून ठरवायची गोष्ट नव्हे. हे जर मान्य असेल तर अर्थव्यवस्थेच्या वेगवेगळ्या विभागात जे मजुरीतील मोठाले फरक आढळून येतात त्यांचे समर्थन करणे कठीण ठरेल.

अनुक्रमणिका

माझे म्हणणे असे आहे की अर्थव्यवस्थेच्या वेगवेगळ्या विभागांत प्रचलित असलेल्या मजुरीत जे मोठाले फरक आढळून येतात त्याचे कारण असे आहे: आज प्रत्येक उद्योगधंद्यात जे अतिरिक्त मूल्य निर्माण होते ते कुणी किती पदरात घ्यायचे हे त्या त्या उद्योगधंद्याचे सार्वजनिक किंवा खाजगी व्यवस्थापक आणि कामगार हे एकमेकांशी सौदा करून ठरवायला मोकळे आहेत. जेव्हा असा सौदा होतो तेव्हा अधिक भांडवली विकास झालेल्या उद्योगधंद्यातील कामगार अधिक मजुरी प्राप्त करून घेऊ शकतात. ह्याची अनेक कारणे आहेत. एक असे की ह्या उद्योगधंद्यांत दर कामकऱ्यामागे अधिक स्थिर भांडवल गुंतविण्यात आलेले असते आणि म्हणून प्रत्येक कामकऱ्यामागे अधिक अतिरिक्त मूल्य पैदा होते. आता उत्पादनसाधनात मूर्त झालेल्या पूर्वकालीन श्रमामुळे जरी हे अतिरिक्त मूल्य उत्पन्न होत असले तरी बुर्ज्वाझी आणि त्या उद्योगधंद्यातील सध्याचे कामगार यांच्यामध्ये वाटून देण्यासाठी उपलब्ध असलेले मूल्य असेच त्याच्याकडे पाहण्यात येते. दुसरे कारण असे की ह्या विभागातील कामगार अधिक संघटित असतात आणि म्हणून त्यांची सौदा करण्याची ताकद अधिक असते. आणि त्यांनी प्राप्त करून घेतलेल्या प्रत्येक वाढीबरोबर ही ताकद वाढत जाते. आणि तिसरे असे की खाजगी क्षेत्रातील बुर्ज्वाझी आणि सार्वजनिक क्षेत्रातील सरकार ह्यांच्याकडे मक्तेदारी बळ अधिक असते आणि म्हणून वाढलेल्या खर्चाचा एक भाग तरी ते अर्थव्यवस्थेच्या कमी विकसित विभागांकडे संक्रांत करू शकतात. हे माझ्या विश्लेषणातील मध्यवर्ती विधान आहे. माझ्या दृष्टीने हे कमी संघटित विभागाचे अधिक संघटित विभागाकडून होणारे शोषण आहे आणि ह्या प्रक्रियेत भांडवलदार आणि कामगार एक होतात.

एक मुद्दा ह्या संदर्भात कित्येकदा करण्यात येतो. आपल्या मजुरीचे मान आणि रहाणीमान सुधारण्यासाठी हे सर्व लढे करूनही संघटित कामगारवर्गाला आपल्या खऱ्या वेतनाचे (real wages) जेमतेम संरक्षण करण्यात काय ते यश आले आहे आणि कित्येक विभागांमध्ये, उदा. सार्वजनिक शासनाच्या विभागामध्ये, खऱ्या वेतनाचे प्रमाण कमी झाले आहे. हा मुद्दा झिडकारून त्याची वासलात मी लावणार नाही. पण जरी तो प्रस्थापित झाला तरी कमी संघटित विभागाचे अधिक संघटित विभागाकडून शोषण होत आहे ह्या माझ्या म्हणण्याचे खंडन त्याच्यामुळे कसे होते हे मला कळत नाही. वेगवेगळ्या विभागात प्रचलित असलेल्या मजुरीत जे भेद आढळतात तो ह्या शोषणाचा पुरावा आहे असा माझा युक्तिवाद आहे. जोपर्यंत हे भेद टिकून आहेत तोपर्यंत हे शोषणही चालूच असते असा त्याचा अर्थ आहे. हे जर मान्य झाले तर गेल्या दशक दोन दशकांत शोषण क्रमश: वाढत गेले आहे काय ह्या मुद्याची चर्चा आपल्याला स्वतंत्रपणे करता येईल.

ह्यासाठी पुरावा म्हणून आपल्याला एक गोष्ट माहीत करून घ्यावी लागेल. संघटित क्षेत्रातील खरी मजुरी वाढली आहे का ? किंवा संघटित आणि असंघटित विभागांतील मजुरीमधील फरक रुंदावले आहेत का ह्या स्वरूपात हा प्रश्न विचारणे अधिक योग्य ठरेल. हे तपासून पहायचे तर वेगवेगळ्या विभागात, विशिष्ट धंद्यांत प्रचलित असलेली वेतनमाने वेगवेगळी घेऊन त्यांचे विश्लेषण करावे लागेल. हे आपण तपासून पाहिले तर, माझा असा तर्क आहे, की आपल्याला असे आढळून येईल : ज्या उद्योगात भांडवली विकास अधिक वेगाने पुढे गेला आहे तेथे ह्या विकासाबरोबरच कामगारांचे खरे वेतनही सुधारले आहे. म्हणजे ज्या उद्योगांत अधिक भरघोस प्रमाणात झालेल्या भांडवली गुंतवणीमुळे आणि सुधारलेले संघटन आणि व्यवस्थापन यांच्यामुळे श्रमाची उत्पादकता वाढली आहे तेथे ह्या वाढलेल्या उत्पादकतेत कामगारांनाही हिस्सा मिळून त्यांचा लाभ झाला आहे. पण मला एकंदरीत जे काय दिसते आहे त्याच्यावर आधारलेला हा केवळ एक तर्क आहे. त्याचे काळजीपूर्वक विश्लेषण होण्याची आवश्यकता आहे आणि ते करण्यासारखे आहे.

समजा असे आढळून आले की वेगवेगळ्या विभागांतील मजुरीच्या मानांमधील फरक वाढलेले नाहीत. मग ह्यापासून काय निष्पन्न होईल ? ह्याचा अर्थ असा होईल का की विकासापासून झालेल्या लाभात संघटित आणि असंघटित ह्या दोन्ही विभा-

अनुक्रमणिका

गांना समान हिस्सा, निदान प्रमाणशीर हिस्सा, मिळाला आहे ? असे म्हणणे अत्यंत कठीण आहे आणि माझ्या टीकाकारांना तसे म्हणायचेही नाही. त्यांचे म्हणणे मला दिसते आहे ते असे की विकासापासून झालेला सर्व लाभ बुर्ज्वाझीने बळकावला आहे आणि परिणामी असंघटित विभाग, तसेच संघटित विभागातील मजुरी मिळविणारे आणि पगारदार पूर्वी होते तेथेच राहिलेले आहेत. आता ह्याविषयी मी जे वर म्हटले आहे आणि पुढे म्हणणार आहे त्याच्याशी हे म्हणणे जितपत सुसंगत असेल तितपत मी ते मान्य करतो. आणि समजा बुर्ज्वाझीने ह्या म्हणण्याचा काही प्रतिवाद केला नाही तर ते काय म्हणतील ? ते असेच म्हणतील की जे अतिरिक्त मूल्य ते ग्रहण करतात त्याचा एक अगदी लहान भाग त्यांच्या ख्यालीखुशालीसाठी खर्च होतो. त्याचा बराच मोठा भाग भांडवलाचा संग्रह करण्यात कामी येतो. आणि त्यामुळे संघटित क्षेत्रातील मजुरी आणि पगार देणाऱ्या नोकऱ्यांचा विस्तार होतो. हे मान्य होण्यासारखे आहे. पण मग ह्याचा अर्थ काय होतो ? त्याचा अर्थ एवढाच होतो की अतिरिक्त मूल्य जर संघटित आणि असंघटित विभागांतील वेतनमानांमधील फरक वाढविण्यासाठी वापरण्यात येत नसेल तर ते संघटित विभागाचा विस्तार करण्यासाठी वापरण्यात येते. संघटित विभागातील मजुरी आणि पगार मिळविणारे कर्मचारी असंघटित विभागातील कर्मचाऱ्यांपेक्षा खूपच अधिक वेतन कमावतात व अशा रीतीने असंघटित विभागाचे शोषण करण्यासाठी बुर्ज्वाझी आणि सरकार यांच्याशी एक होतात. तेव्हा जरी संघटित आणि असंघटित विभागातील वेतनमानामधील फरक वाढत गेले नाहीत तरी संघटित गटाकडून असंघटित विभागाचे शोषण होण्याची प्रक्रिया क्रमशः वाढत जाते.

आता असे म्हणण्यात येईल की औद्योगिक उत्पादन ज्या प्रमाणात वाढले आहे त्या प्रमाणात उद्योगधंद्यातील नोकऱ्या वाढलेल्या नाहीत. ही गोष्ट खरी आहे. पण तिचा येथे काही संबंध नाही. असंघटित विभागात प्रचलित असलेल्या मजुरीपेक्षा खूपच अधिक वेतन देणाऱ्या उद्योगधंद्यातील नोकऱ्या जर थोड्या किंवा फार वाढत असतील–किती प्रमाणात वाढतात हा प्रश्न नाही- तर मी वर वर्णन केलेली प्रक्रिया सुरूच आहे असे म्हटले पाहिजे. उत्पादनाच्या विस्ताराच्या प्रमाणात नोकऱ्यांत वाढ होत नाही ह्याचा अर्थ एवढाच की भांडवली विकासाची प्रक्रिया पुढे झेपावत आहे आणि अधिक भरघोस भांडवली गुंतवणूक आणि अधिक सुधारलेले संघटन आणि व्यवस्थापन ह्यांच्या योगे शोषणाची प्रक्रिया सुरू ठेवण्यासाठी आवश्यक असलेली बैठक अधिक मजबूत होत आहे. पण माझे म्हणणे आहे ते असे. औद्योगिक कामगार आपल्या वर्गाची खरी मजुरी वाढवून किंवा आपल्या वर्गाच्या संख्येचा विस्तार करून अतिरिक्त मूल्याचा सर्व प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्ष लाभ आपल्या वर्गाला व्हावा ह्यासाठी बुर्ज्वाझी किंवा सरकार यांच्याशी संगनमत करतात, म्हणजे असंघटित वर्गाचे शोषण करण्यासाठी संगनमत करतात.

औद्योगिक नोकऱ्यांच्या किंवा ज्यांना मार्क्स सामान्यपणे उत्पादक नोकऱ्या म्हणत असे त्यांचा जो विस्तार झाला आहे त्यापेक्षा अधिक चिंतेची बाब म्हणजे सामान्य प्रशासन किंवा कल्याणकारी सेवाक्षेत्रे यांतील नोकऱ्या, ज्यांना मार्क्स अनुत्पादक नोकऱ्या म्हणत असे अशा नोकऱ्यांत झालेली वाढ. अतिरिक्त मूल्याचा बराचसा भाग आधुनिक राज्य ग्रहण करते आणि तो शासन आणि कल्याणकारी सेवाक्षेत्रे चालविण्यासाठी उपयोगात आणते. ह्याला भारत अपवाद नाही. किंबहुना भारतात संघटित क्षेत्रांमध्ये उत्पादक नोकऱ्यांचा जो विस्तार झाला आहे त्यापेक्षा अशा अनुत्पादक नोकऱ्यांचा विस्तार अधिक जलद गतीने झाला आहे. ह्या विभागातील मजुरी आणि पगार संघटित उत्पादक क्षेत्रातील मजुरी आणि पगार यांच्या एवढेच आहेत, अधिकच असतील. तेव्हा ह्या कामकऱ्यांचा सुद्धा असंघटित विभागाच्या चाललेल्या शोषणात हात आहे हे स्पष्ट आहे. शिवाय सर्वसाधारण शासनसुद्धा संघटित विभागाच्या हिताला अनुकूल ठरेल अशा रीतीने व्यवहार करते आणि राज्याकडून ज्या कल्याणकारी सेवा उपलब्ध करण्यात येतात त्यांचा उपयोगही हाच विभाग अधिक प्रमाणात करून घेतो. तेव्हा राज्याचे सर्वसामान्य शासन आणि त्याने चालविलेल्या कल्याणकारी सेवा यांच्यामुळेही संघटित गटाकडून असंघटित विभागाच्या होणाऱ्या शोषणाला बळकटीच येते.

ह्या शोषणापासून निसटून जाण्यासाठी असंघटित विभाग काय करतो? संघटित विभाग नष्ट करण्याचा प्रयत्न तो करीत नाही. असंघटित असल्यामुळे हे बळ त्यांच्यात नसते. किंबहुना असंघटित असल्यामुळे एक वर्ग म्हणूनही तो काही प्रतिक्रिया करीत नाही. त्याऐवजी त्याचे वैयक्तिक सभासद आपला वर्ग सोडून देऊन दुसऱ्या वर्गात सामील होण्याचा निकराने प्रयत्न करतात. मी असे म्हटले आहे की त्यांचे उद्दिष्ट काय असते तर ते हे की त्यांना महिन्याच्या पहिल्या तारखेला हमखास उत्पन्न देणारी नोकरी पाहिजे असते; पाऊस पडो, न पडो; त्यांनी उत्पादन केले असो, नसो; त्यांनी उत्पादन केलेले खपो, न खपो, त्यांना हमखास उत्पन्न देणारी नोकरी त्यांना पाहिजे असते. मार्क्सने जो उत्पादक नोकरी आणि अनुत्पादक नोकरी यांच्यांत भेद केला आहे तो मी केला पाहिजे होता. हा भेद केला तर 'त्यांनी उत्पादन केलेले खपो, न खपो' हे म्हणणे उत्पादक नोकरी करणाऱ्या विषयीचे आहे; 'त्यांनी उत्पादन केले असो, नसो' हे अनुत्पादक नोकरी करणाऱ्या-विषयीचे आहे; आणि 'पाऊस पडो, न पडो, दर महिन्याच्या पहिल्या तारखेला हमखास उत्पन्न देणारी नोकरी' हे दोघांविषयीचे आहे.







## ग्रंथ-परीक्षण

**साहित्यवेध :** लेखक : डॉ. निर्मलकुमार फडकुले, प्रकाशक : श्री. स. कृ. पाध्ये, व्हीनस प्रकाशन, ३८१ क, शनिवार पेठ, पुणे- ३०. पहिली आवृत्ती : १९७८, पृष्ठे १२७ : मूल्य रुपये दहा.

'लोकहितवादी : काल आणि कर्तृत्व' या प्रबंधाचे लेखक, डॉ. निर्मलकुमार फडकुले यांची 'संतकवी तुकाराम : एक चिंतन व 'साहित्यवेध' ही दोन पुस्तके यावर्षी प्रसिद्ध झाली आहेत. एक शैलीदार वक्ते आणि लेखक म्हणून डॉ. फडकुले यांनी लौकिक संपादन केला आहे. 'साहित्यवेध' या त्यांच्या नव्या लेखसंग्रहात त्याचा उत्तम प्रत्यय येतो. या पुस्तकात विविध विषयांवरील एकूण बारा लेखांचा समावेश करण्यात आला आहे. त्यातील पहिले पाच लेख प्राचीन मराठी संतसाहित्याचा परामर्श घेणारे असून उर्वरित लेखांत आधुनिक मराठी साहित्यातील नवीन समस्यांची तात्त्विक चर्चा करण्यात आली आहे. 'अश्रूंनी भिजलेली चोखामेळयाची कविता' आणि 'दलित साहित्य : नवनिर्मितीची रग' हे दोन लेख एकाच विषयाची बदलती रूपे स्पष्ट करतात. दलितांचे जीवन ही त्यांच्या दृष्टीने एका अंधाराची कहाणी आहे. त्यांचा सामाजिकच काय परंतु आध्यात्मिक आक्रोशही दुर्लक्षिला गेला ही खंत त्यांना आहे. चोखामेळ्याच्या कवितेचे मूल्यमापन करताना सर्व संतांनी वर्णाश्रमधर्माचा आणि जातिव्यवस्थेचा पुरस्कार केला आहे, असे ते सांगतात. तथापि 'संतसाहित्याची भूमिका' मांडताना 'जुन्याचे विसर्जन आणि नव्याची निर्मिती या उद्दिष्टांनी संतांनी कविता लिहिली,' असेही सांगतात. यासारख्या विधानांनी त्यांच्या पूर्वीच्या भूमिकेस छेद जातो, असे वाटते. संतांचे मानवताप्रेम, त्यांचे सामाजिक भान आणि कर्मयोगावरील त्यांचा भर यांचे साधार विश्लेषण डॉ. फडकुले यांनी केले आहे.

ज्ञानेश्वरांचा दृष्टिकोण आणि त्यांची वृत्ती ही एका कलावंताची आहे, या सूत्रातून ज्ञानदेवांच्या चिरतरुण कवित्वाचा विचार त्यांनी केला आहे. त्यांच्या जीवनदृष्टीला उत्कट आणि भव्य अधिष्ठान असल्यामुळे त्यांची प्रतिभा मानवतावादी उदार विचारभावनेचा आविष्कार करू शकली. त्यात त्यांच्या समृद्ध आणि परिणत जीवनदृष्टीचा प्रत्यय येतो. 'सृष्टीतील सूक्ष्मातिसूक्ष्म सौंदर्यछटांचे उत्कट रसपान करू शकणाऱ्या एका कलासक्त, रससिद्ध तत्त्ववेत्त्याने आपल्या वाणीचे आणि व्यक्तिमत्त्वाचे सर्व विलोभनीय विशेष या साहित्यकृतीत मुक्त हस्ताने उधळलेले जाणवते.' अशा शब्दात ज्ञानदेवांच्या चिरतरुण कवित्वावरील आपली मार्मिक प्रतिक्रिया ते व्यक्त करतात. ज्ञानदेव आणि नामदेव ही एकाच व्यक्तित्वाची दोन अंगे आहेत. त्यांच्या कार्याचे मूल्यमापन करताना जातीय वरिष्ठ-कनिष्ठ भावाकडे, ज्ञानदेव-नामदेवांनी दूरगामी विचार करून सामाजिक दृष्टीने पाहिले होते; आणि 'म्हणौनि कुळजातिवर्ण । हे आघवेचि गा अकारण' हा ज्ञानेश्वरांचा समतावादी विचार संत नामदेवांनी पराकाष्ठेच्या प्रयत्नांनी समाजात रुजविला, ही महत्त्वाची भूमिका डॉ. फडकुले यांनी मांडली आहे. या उभयतांच्या परस्परपूरक कार्याचे त्यांनी केलेले विश्लेषण अनाग्रही आणि म्हणूनच परिणामकारक बनले आहे. तुकारामांची कविता ही त्यांच्या जीवनसंघर्षाची प्रतिक्रिया आहे. त्यामुळे ज्ञानदेव नामदेवांहून त्यांच्या कवितेचा आविष्कार अधिक प्रखर आणि प्रभावी झाला आहे. वास्तवाचा विदारक अनुभव घेतलेल्या तुकारामांची कविता स्वाभाविकपणेच स्वप्नाळू राहिलेली नाही. वैफल्य आणि पराभूतपणा यांपेक्षा संघर्षाला तितक्याच निर्भयपणे तोंड देणाऱ्या निधड्यावृत्तीच्या संतकवीचे दर्शन तुकारामांच्या कवितेत घडते. संत तुकारामांवर डॉ. फडकुले यांनी स्वतंत्र ग्रंथच लिहिला आहे. तथापि या एका लेखातही तुकारामांच्या कवितेची प्रमुख वैशिष्टये डोळसपणे त्यांनी टिपली असल्याचे निदर्शनास येते.

अनुक्रमणिका

अंधार हाच ज्यांच्या जीवनाचा स्थायीभाव बनला, त्या दलितांच्या साहित्यातील अस्वस्थता आणि वेदनांची दखल डॉ. फडकुले यांनी सहानुभूतीने घेतली आहे. त्यांच्या व्यथा-वेदनांचे यथार्थ मूल्यमापन व्हावयाचे असेल, तर वाङ्मयीन मूल्यांकनाचे निकषही बदलावे लागतील, असे त्यांचे मत आहे. तथापि आजचे दलित साहित्य हे मुख्यतः प्रतिक्रियात्मक असून साहित्याच्या व्यापक पार्श्वभूमीवर दलित साहित्य या शब्दप्रयोगाला फारसा अर्थ नाही, हेही त्यांनी स्पष्टपणे सांगितले आहे. साहित्यात अशा तऱ्हेचा एकांगीपणा न येण्यासाठी साहित्यिकांना सर्वांगीण सामाजिक भान असण्याची गरज त्यांनी प्रतिपादिली आहे. मध्यमवर्गीय साहित्य विशिष्ट सामाजिक कोशातच रमते, त्याची दुसरी आवृत्ती म्हणजे दलित साहित्य असे होऊ नये. कामक्षुधेला मानवी जीवनात जितके स्थान आहे, तितकेच किंबहुना अधिक महत्त्व अन्नक्षुधेलाही आहे, याचे भान साहित्यिकांनी ठेवले तर त्यांचे साहित्य जीवनाचा सम्यक् विचार करू शकेल. त्यासाठी साहित्यिकाच्या अनुभवाच्या व सहानुभूतीच्या कक्षा रुंदावल्या पाहिजेत. आजच्या व्यापक व गतिमान जीवनात सर्वच अनुभवांची प्रतीती अशक्य असली तरी समाजविषयक भाव व सहानुभूतीमुळे साहित्याला व्यापक अधिष्ठान प्राप्त होऊ शकते. समकालीन साहित्यातील विचारप्रवाहांचा साधार मागोवा घेत असताना डॉ. फडकुले यांचे चिकित्सक मन शाश्वत साहित्यमूल्यांचाही विचार करीत असते, हे या संग्रहातील सर्वच लेखांतून प्रकर्षाने जाणवते.

'ललित साहित्यातील योगायोग,' 'साहित्य : मागणी आणि पुरवठा,' 'चारित्र्य आणि साहित्य.' 'साहित्यांतील श्लील आणि अश्लील या लेखांचे स्वरूप त्यांतील शैली व व्यक्तिगत अनुभवांचा स्पर्श यांमुळे काहीसे लघुनिबंध सदृश झाले आहे. ललित साहित्यातील तर्काधिष्ठिततेचा निकष त्यांना अमान्य असून मानवी जीवन मुळातच तसे नसते व योगायोगाचा भाग त्यात मोठा असतो; साहित्याच्या निर्मितीमागील प्रेरणा केवळ लोकरंजनाची असली, तर त्या साहित्याला उदंड लोकाश्रय मिळूनही ती साहित्यकृती श्रेष्ठ, गुणसंपन्न ठरणार नाही; महान आशयाचे उगमस्थान महान चारित्र्यात असते; अश्लीलता शब्दात नसून वाचकाच्या मनात असते इ. मतांचा पाठपुरावा या लेखांतून लेखकांनी केला आहे. 'शोकनाट्य : काही विचार' हा या संग्रहातील साहित्यक्षेत्रातील एका महत्त्वाच्या विषयाचा ऊहापोह करणारा व्यासंगपूर्ण लेख आहे. शोकनाट्याचे भारतीय व पाश्चात्य साहित्यातील स्थान, त्याकडे पाहाण्याचा उभयतांचा दृष्टिकोण, शोकनाट्य व सुखात्मिका यांच्या स्वरूपातील मूलभूत फरक शोकनाट्याचे वाङ्मयीन स्वरूप यांची मौलिक चर्चा डॉ. फडकुले यांनी या लेखात केली आहे.

डॉ. निर्मलकुमार फडकुले यांचा हा 'साहित्यवेध' त्यांच्या रसिक वृत्तीने आणि रसाळ शैलीने आकर्षक बनला आहे. समुचित अवतरणानी आपला विषय ते फुलवीत नेतात. विशिष्ट विषयावरील आपली मते ठामपणे मांडताना त्यांच्या शैलीला आग्रही तसेच आक्रमक स्वरूप प्राप्त होते. तथापि त्या विषयांच्या अन्य बाजूही मांडून त्यांचे वैयर्थ्य ते पटवीत जातात, साहित्य आणि समाज यांचेविषयीच्या आस्थेवाईक चिंतनातून त्यांच्या या साहित्याची निर्मिती झालेली आहे. त्यांच्या समाजोन्मुख आणि जीवनवादी दृष्टिकोणाचा आढळ या सर्वच लेखांतून होतो. एखाद्या विषयाचे स्वरूप गंभीर आणि कदाचित नीरस वाटले, तरी आपल्या लालित्यपूर्ण शैलीने त्यांनी ते वाचनीय बनविले आहे. प्रस्तुत 'साहित्यवेध' हा लेखसंग्रह म्हणजे साहित्य क्षेत्रातील सतत जाणवणाऱ्या समस्यांचा एका रसिक आणि चिकित्सक मनाने घेतलेला शोध होय.

डॉ. वसंत स. जोशी

# सार-संकलन

## परदेश :

### आयझॅक बाशेव्हिस सिंगर :

१९७८ चे साहित्याचे नोबेल पारितोषिक आयझॅक बाशेव्हिस सिंगर ह्या पोलिश–ज्यू अमेरिकन लेखकाला देण्यात आले आहे. सिंगर हे यिडिश भाषेत लिहितात पण त्यांची जवळजवळ सर्व पुस्तके इंग्रजी भाषांतरात उपलब्ध आहेत. यिडिश भाषा ही जर्मन, हिब्रू आणि स्लाव भाषांच्या मिश्रणाने बनली आहे. मध्य आणि पूर्व युरोपमधील ज्यू लोकांची ती प्रमुख बोलभाषा आहे. पण आज ती एक मुमुर्षू भाषा आहे. इस्त्राइलची अधिकृत भाषा हिब्रू आहे. सिंगर जरी गेले ४३ वर्षे अमेरिकेत निवास करून आहेत आणि जरी त्यांनी अमेरिकेचे नागरिकत्व स्वीकारले आहे तरी त्यांनी आपले लेखन इंग्रजीत केले नाही, आपल्या मातृभाषेत केले.

सिंगर यांचा जन्म जुलै १४, १९०४ रोजी पोलंडमधील लिऑन्सिन ह्या गावी झाला. त्यांचे वडील एक 'अनधिकृत' राबाय–ज्यू धर्मगुरू– होते. आपल्या घरी धार्मिक न्यायनिवाडा करणारे न्यायालय ते भरवीत आणि त्याचे अध्यक्ष म्हणून काम पहात. पण ह्यातून त्यांना काही आर्थिक प्राप्ती होत नसे आणि घरी अठराविश्वे दारिद्र्य असे. सिंगर यांचे बालपण अशा बिकट परिस्थितीत गेले. 'माझ्या वडिलांच्या न्यायालयात'– 'इन माय फादर्स कोर्ट'– ह्या त्यांच्या आत्मचरित्रात्मक ग्रंथात पूर्व युरोपातील ज्यू जमातीचे शापित जग मूर्त झाले आहे. स्वीडिश आकादमीने त्यांना दिलेल्या गौरवपत्रात ह्या ग्रंथाचा खास निर्देश करण्यात आला आहे. दारिद्र्य आणि धार्मिक छळ, चिवट धर्मश्रद्धा आणि अडाणी पारंपरिक समजुती ह्यांनी घडविलेल्या ह्या जगाच्या दर्शनातून सिंगर ह्यांनी 'मानवी जीवनाच्या सार्वत्रिक परिस्थितीवर प्रकाशझोत टाकला आहे' असे त्यात म्हटले आहे. हे गौरवपत्र पुढे म्हणते, 'सिंगर यांच्या साहित्यात राक्षस, भुते, पिशाच्चे आणि ज्यू जमातीच्या कल्पनाशक्तीने निर्माण केलेल्या लोकपरंपरेच्या समृद्ध भांडारातील आसुरी आणि दैवी शक्ती, यांची रूपे घेऊन मानवी वासना आणि माणसांचे तऱ्हेवाइक छंद अवतरतात. नेहमीच्या जीवनात अद्‌भुत चमत्कारांचे आडवेउभे धागे बेमालूमपणे मिसळले जातात, स्वप्नांच्या तंतूमधून वास्तवाची वीण आकारत जाते. अशा निर्मितीतून सिंगर यांची कहाणी सांगण्याची कला आपल्या सर्वात मोठ्या यशाचे उत्सव साजिरे करते.'

'धि फॅमिली मोस्कात,' 'धि मॅनॉर' आणि 'धि इस्टेट' ही त्रिखंडात्मक कादंबरी त्यांच्या सर्वश्रेष्ठ कृतीमध्ये गणली जाते; १९५३ मध्ये त्यांच्या वयाच्या ४६ व्या वर्षी त्यांच्या 'गिंपल, धि फूल' – 'मूर्ख गिंपल' – ह्या लघुकथेचे सॅम बेलो ह्या नोबेल पारितोषिक विजेत्या अमेरिकन लेखकाने जेव्हा भाषांतर केले तेव्हा सिंगर प्रसिद्ध झाले. पण 'फॉर्वर्ड' ह्या न्यू यार्कमधून प्रसिद्ध होणाऱ्या यिडिश वर्तमानपत्रात ते अजून नेमाने लिहितात. ते शाकाहारी आहेत आणि कबुतरांना दाणे भरविणे हा त्यांचा आवडता छंद आहे.

### पश्चिम आशिया :

अमेरिकेचे अध्यक्ष कार्टर यांच्या मध्यस्तीने इजिप्तचे अध्यक्ष अन्वर सादत आणि इस्त्राइलचे पंतप्रधान बेगिन ह्यांच्यामध्ये जो समझौता घडून आला आहे. (१७ सप्टेंबर १९७८) त्यामुळे युद्धाच्या काठावर वावरणाऱ्या पश्चिम आशियामध्ये टिकाऊ शांतता प्रस्थापित होण्याची शक्यता निर्माण झाली आहे. हा समझौता दोन कागदपत्रात नमूद करण्यात आला आहे.

एका कागदपत्रात अशी शांतता प्रस्थापित करण्याचे प्रयत्न ज्या चौकटीत करणे आवश्यक आहे ती निश्चित करण्यात आली आहे. आज एकमेकांसमोर ठाण मांडून बसलेल्या पश्चिम आशियातील

राष्ट्रांनी परस्परांमधील झगडे मिटविण्यासाठी सुरक्षा-मंडळाच्या ठरावांना अनुसरून परस्परांशी शांततेचे तह केले पाहिजेत आणि न्याय्य, सर्वसमावेशक आणि टिकाऊ अशी शांततेची घडी ह्या भागात बसविली पाहिजे, हे साधण्याचा निर्धार सादत आणि बेगिन यांनी व्यक्त केला आहे. ह्याबरोबरच, ही शांतता जर टिकून रहायची असेल, तर ह्या झगडयाशी ज्यांचा खोल संबंध आला आहे ते सर्व तिच्यात सहभागी असले पाहिजेत ह्या गोष्टीची दखल ह्या नेत्यांनी घेतली आहे. ह्याला अनुसरून इजिप्त, इस्राइल, जॉर्डन आणि पॅलेस्टीनियन लोकांचे प्रतिनिधी ह्या सर्वांनी वाटाघाटी करून पॅलेस्टाइनच्या समस्येची सोडवणूक करण्यात सहभाग घेतला पाहिजे ह्या गोष्टीला दोघांनी संमती दिली आहे.

आज जॉर्डनचा पश्चिम काठ आणि गाझा हे प्रदेश इस्राइलच्या ताब्यात आहेत. पण ह्या प्रदेशातील रहिवाशांनी स्वतंत्रपणे निवडलेले स्वायत्त सरकार जेव्हा अस्तित्वात येईल तेव्हा सध्याच्या इस्रायली लष्करी आणि नागरी शासनाची जागा ते घेईल अशी तजवीज उभयतांनी मान्य केली आहे. ह्या गोष्टीला पाच वर्षांपेक्षा अधिक कालावधी लागणार नाही अशी तरतूद करण्यात आली आहे. हे स्वायत्त सरकार निवडणुकीच्या मार्गाने कसे घडविण्यात येणार आहे, त्याचे अधिकारक्षेत्र आणि कार्यपद्धती कोणती राहील ह्याचा तपशिलही ह्या कागदपत्रात नमूद करण्यात आला आहे. पॅलेस्टीनियन लोकांचे न्याय्य अधिकार आणि आकांक्षा ह्यांची कदर करण्यात येईल आणि ह्या स्थित्यंतराच्या काळात आणि नंतरही इस्राइल व त्याची शेजारी राष्ट्रे ह्यांच्या सुरक्षेचे पालन करण्यासाठी आवश्यक ती तजवीज करण्यात येईल. ह्या भावी शांततेच्या, सहकार्याच्या आणि मैत्रीच्या वातावरणात आर्थिक विकासासाठी इजिप्त व इस्राइल परस्परांशी कोणत्या मार्गांनी सहकार्य करू शकतील ह्याचा शोध घेण्याचेही ठरले आहे.

दुसऱ्या करारपत्राप्रमाणे इजिप्त आणि इस्राइल यांनी सदिच्छापूर्ण वातावरणात वाटाघाटी करून तीन महिन्यांच्या कालावधीत परस्परांशी करावयाच्या तहनाम्याचा आराखडा पक्का करावा असे ठरले आहे. शांततेच्या तहनाम्यावर सह्या झाल्यानंतर तीन ते नऊ महिन्यांच्या आत सर्व इस्राइली सेना सिनाइपासून माघारी घेण्यात येऊन उभयपक्षांना संमत अशा रेषेच्या पूर्वेला ठेवण्यात येईल.

अरब– इस्रायली झगडयात कडक भूमिका घेणाऱ्या अरब राज्यांच्या दृष्टीने– म्हणजे सिरिया, लिबिया, अल्जीरिया, दक्षिण येमेन ह्यांच्या दृष्टीने – तसेच पॅलेस्टाइन मुक्तिसंघटनेच्या दृष्टीने कॅंप डेव्हिड समझौत्यात आक्षेपार्ह गोष्टी निश्चितपणे आहेत. इस्रायली सेना पश्चिम काठापासून पूर्णपणे मागे घेण्यात येतील असे आश्वासन ह्या समझौत्यात नाही. तसेच तेथे स्वतंत्र व सार्वभौम असे पॅलेस्टीनियन राज्य स्थापन व्हायला इस्राइलने संमती दिली आहे असेही त्याच्यात स्पष्टपणे नमूद नाही. गोलन पठारांचा त्याच्यात निर्देश नाही किंवा जेरुशलेमचा दर्जा काय रहाणार आहे ह्याचा उल्लेख नाही. पॅलेस्टाइन मुक्तिसंघटनेला मान्यता देण्यात आलेली नाही. समझौत्यात संमत झालेल्या तजविजींच्या अर्थाविषयी सादत आणि बेगिन ह्यांच्यात मतभेदही निर्माण झाले आहेत. वर ज्यांचा कडवी भूमिका घेणारे म्हणून उल्लेख केला आहे त्या सर्व अरब राज्यांनी इजिप्तबरोबरचे सर्व आर्थिक व राजकीय संबंध तोडून टाकण्याचे ठरविले आहे. पण सौदी अरेबिया आणि जॉर्डन ह्या राज्यांनी जर अखेरीस इजिप्तला साथ देण्याचे ठरविले, तर ह्या बहिष्काराचा फारसा परिणाम न होता इजिप्त आणि इस्राइल यांच्या दरम्यान झालेला करार अंमलात येईल असा अंदाज आहे. जॉर्डन अखेरीस ह्या कराराला अनुकूल होईल अशी दाट शक्यता आहे कारण आपल्या पायरीवरच जर स्वतंत्र व सार्वभौम पॅलेस्टीनियन राज्य निर्माण झाले, तर त्याच्यापासून आपल्याला धोका, निदान अनेक गंभीर अडचणी निर्माण होण्याचा संभव आहे ह्याची त्याला कल्पना आहे. सौदी अरेबियाची भूमिका अधिक अनिश्चित आहे. त्याने जर प्रतिकूल भूमिका घेतली, तर इजिप्तला वठणीवर आणण्यासाठी एका प्रबळ हत्याराचा वापर ते करू शकते. इजिप्तला ते करीत असलेले आर्थिक साहाय्य जर त्याने संपुष्टात आणले, तर इतर अरब राष्ट्रांपासून फटकून वागणे इजिप्तला शक्य होणार नाही.

अनुक्रमणिका

सर्वसामान्य इजिप्शियन जनतेने कराराचे स्वागत केले आहे. अरब राष्ट्रसमूहाचे नेतृत्व करण्याच्या महत्त्वाकांक्षेची व्यावहारिक किमत असह्य ठरते असा तिचा अनुभव आहे. शिवाय आजची परिस्थिती बळाचा वापर करून बदलण्याचे सामर्थ्य अरब राष्ट्रसमूहात नाही हे उघड आहे. ह्या परिस्थितीत इस्राइलने ह्या करारात जेवढे नमते घेतले आहे त्यापेक्षा अधिक नमते ते घेईल हे असंभवनीय आहे. जे शक्य असेल ते साधण्याची कला असे राजकारणाचे करण्यात येणारे वर्णन परराष्ट्रधोरणाला अधिक लागू पडते.

### देश :

काश्मीरचे पंतप्रधान शेख अब्दुल्ला ह्यांनी आपल्या मंत्रिमंडळातील मंत्र्यांना एक नवीन शपथ घेण्याचा आदेश दिला. ही शपथ अशी की ' ईश्वराला स्मरून मी अशी शपथ घेतो की राष्ट्रीय परिषद (नॅशनल कॉन्फरन्स) आणि तिचे नेते शेख अब्दुला ह्यांच्याशी मी निष्ठा राखीन.' सप्टेंबर २२ रोजी त्यांच्या मंत्रिमंडळातील सहकाऱ्यांनी ही शपथ घेतली. शेख अब्दुल्ला ह्यांची लोकशाहीवरील निष्ठा प्रसिद्धच आहे. काश्मीरच्या लोकांचे कल्याण साधण्यासाठी काश्मीरवर आपली अबाधित सत्ता चालत असणे आवश्यक आहे हेही त्यांना स्पष्टपणे दिसत असावे. लोकांच्या कल्याणाशी निष्ठा राखणे म्हणजे लोकशाहीवर निष्ठा राखणे होय आणि काश्मीरमध्ये लोकांच्या कल्याणावर निष्ठा राखायची तर हे कल्याण साधण्याचे एकमेवाद्वितीय साधन असलेल्या शेख अब्दुल्लांच्या नेतृत्वावर निष्ठा राखली पाहिजे ह्या दोन जवळजवळ स्वतःप्रमाण असलेल्या विधानांपासून काश्मीरमध्ये लोकशाहीवर निष्ठा राखायची तर शेख अब्दुल्लांच्या वैयक्तिक नेतृत्वावर निष्ठा राखली पाहिजे हे विधानही अनिवार्यपणे निष्पन्न होते. शेख अब्दुल्लांचा प्रामाणिकपणा त्यांच्या भारतनिष्ठेइतकाच संशयातीत आहे. पण हा प्रामाणिकपणा आणि ही निष्ठा अतिशय सूक्ष्म भेदांवर आधारलेली आहे. ह्यामुळे अनेक विषयांवर त्यांची नेमकी मते काय आहेत– उदा. ' निधर्मी (सेक्युलर) राजवट म्हणजे नेमके काय?' किंवा ' काश्मीर भारतीय संघराज्याचा अविभाज्य भाग आहे की नाही' ह्यासारख्या विषयांवर त्यांची मते काय आहेत हे सांगणे सूक्ष्मांत शिरलेल्यांनाच नीटपणे कळू शकेल. शेख अब्दुल्लांच्या प्रामाणिकपणाबद्दल शंभर टक्के खात्री बाळगीत असताना सुद्धा असे म्हणावेसे वाटते की लोकशाहीवरील निष्ठा ही काही तत्त्वांवरील निष्ठा असते आणि ही तत्त्वे एखाद्या व्यक्तीच्या ठिकाणी मूर्त झाली असली, तरी त्या तत्त्वांच्या ठिकाणी त्या व्यक्तीची स्थापना केली आणि तिला निष्ठा वाहिली, तर जो मार्ग अखेरीस हुकूमशाहीला जाऊन भिडतो त्या मार्गावरील ते पहिले पाऊल ठरते.

### बंगालमधील महापूर :

देशात घडणाऱ्या कोणत्या घटना महत्त्वाच्या असतात ? जनता पक्षाच्या मध्यवर्ती नेतृत्वातील सार्वजनिक रीतीने चाललेली घरगुती भांडणे की श्रीमती इंदिरा गांधी यांनी चिकमगरूळची पोटनिवडणूक लढविण्याचा केलेला निर्णय की बंगालमध्ये नुकताच येऊन गेलेला महापूर ? ह्या पुरामुळे १५ लक्ष गुरे नष्ट झाली, पिकांचे २३५ कोटी रुपये एवढे नुकसान झाले आणि निदान ७६३ माणसे मृत्यूमुखी पडली. हा तडाखा एवढा जबरदस्त आहे की एक नैसर्गिक आपत्ती म्हणून त्याची तुलना १९४३ मधील दुष्काळाशीच करता येईल. १९४३ च्या बंगालच्या दुष्काळात ३५ लक्ष माणसे उपासमारीने मेली होती आणि अशा प्रत्येक मेलेल्या माणसामागे नफाखोरांनी रु. १०,००० कमावले होते असा एक अंदाज आहे. बंगालचा दुष्काळ ही नैसर्गिक आपत्ती नव्हती; ती मानवनिर्मित आपत्ती होती. नुकताच येऊन गेलेला महापूर हीसुद्धा मूलतः नैसर्गिक आपत्ती नव्हती, तीही मानवनिर्मित होती असे मानायला आधार आहे. कारण पुरांमुळे होणाऱ्या प्रलयाविरुद्ध प्रतिबंधक उपाय म्हणून जी धरणे बांधली गेली आहेत त्यांच्यामुळे यंदाच्या महापुराला प्रलयाचे स्वरूप दिले गेले. पावसाच्या मुसळधारेने तुडुंब वहात असलेल्या नद्यांत दामोदर नदीवरील धरणांतून पुराच्या अकराव्या दिवशी १ लक्ष २० हजार क्युसेक्स, मयुराक्षी धरणातून २० हजार क्युसेक्स आणि कंसगबती धरणातून १० हजार क्युसेक्स पाणी सोडण्यात आले. ह्यामुळे नद्यांचे काठ तर कोसळलेच पण प्रवाहाचा वेग इतका वाढला की

सैनिकी होड्यांनाही प्रवाहातून वाट काढणे अशक्य झाले. पुरांवर प्रतिबंधक उपाय म्हणून जी सर्वंकष योजना बनविण्यात आली होती, तिचे दोन भाग होते. एक, पाणी अडविण्यासाठी पुरेशी धरणे बांधणे आणि दुसरा, नद्यांची पात्रे खोल करणे. दुसरा भाग हाती घेण्यात आलाच नाही. पहिला भाग अर्धवटपणे उरकण्यात आला. निसर्गाला खिजविल्यासारखे आपण केले.

परिणामी आज दुर्गापूरचा पोलाद कारखाना बंद पडला आहे, कोकच्या खाणी अनेक महिने बंद राहतील आणि ह्याचा परिणाम औद्योगिक उत्पादन मंदावण्यात होईल. खेडेगावातील लहान कारागिरांचा धंदा पूर्णपणे बुडाला आहे. आता सर्वस्व हरविलेल्या आणि उन्मळलेल्या ग्रामीण जनतेचा लोंढा कलकत्त्याकडे धाव घेईल आणि कलकत्त्याच्या विपन्नावस्थेत भर पडेल. 'युद्धपातळी'वर प्रयत्नांची पराकाष्ठा करून ह्या लोकांचे त्यांच्या प्रदेशात पुनर्वसन करणे आवश्यक आहे. पण जनतापक्षाच्या केंद्रीय नेतृत्वातील घरगुती भांडणांच्या खमंग बातम्यांमुळे ही समस्या लोकांच्या दृष्टिआड होईलही..

हे मासिक पां. गो. आपटे यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ वाई यांचे करिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

REGD. NO. SAT 2

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

## मराठी

| | | |
|---|---|---|
| (१) | वैदिक संस्कृतीचा विकास : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ....... | ३०.०० |
| (२) | अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर ( पूर्वार्ध ) : ............... ब्र. स्वामी केवलानंदसरस्वती ............... | ७५.०० |
| (३) | इतिहासाचे तत्त्वज्ञान : प्रा. सदाशिव आठवले .............. | १०.०० |
| (४) | क्रोचेचे सौंदर्यशास्त्र : एक भाष्य : डॉ. रा. भा. पाटणकर ...... | १०.०० |
| (५) | सिंधु संस्कृति, ऋग्वेद व हिंदु संस्कृती : प्र. रा. देशमुख ....... | १०.०० |
| (६) | पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास : ........ डॉ. सुमंत मुरंजन ........ | ८.०० |
| (७) | चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान : प्रा. सदाशिव आठवले ..... | ६.०० |
| (८) | मानवाचा आदर्श } ले. मानवेंद्रनाथ रॉय .............. | ६.०० |
| (९) | नवमानवतावाद } अनु. गोवर्धन पारीख .............. | ५.०० |
| (१०) | गीता-प्रवेश : डॉ. गो. वि. देवस्थळी .............. | ५.०० |
| (११) | लोकशाहीचे धोके : पन्नालाल सुराणा .............. | ४.०० |
| (१२) | भारतीय स्त्रीधर्माचा आदर्श : सौं. कमल पाध्ये .......... | ४.०० |
| (१३) | हिंदी साहित्यविचार : प्रा. प्यारेलाल गोहेल ............ | ३.०० |
| (१४) | महाराष्ट्रातील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना : .......... चा. अ. दाभोलकर .......... | २.०० |
| (१५) | श्री. यशवंतराव चव्हाण – अभिनंदनग्रंथ ................ | २०.०० |
| (१६) | संशोधन साधना : डॉ. वसंत स. जोशी .............. | १२.०० |
| (१७) | ज्ञानदेव चिंतन ( संपादित ) : डॉ. वसंत स. जोशी ......... | २०.०० |
| (१८) | आनंदाचा डोह : प्रा. रा. ग. जाधव .............. | ८.०० |
| (१९) | भावार्थ रामायण ( श्री एकनाथ महाराज कृत ) बालकांड : .... | १२.०० |
| (२०) | तरंगयामिक व पुंजयामिक : मा. ग. टोळे ............... | ५.०० |
| (२१) | निळी पहाट : (मराठी दलित साहित्याची मीमांसा) रा. ग. जाधव ... | ९.०० |

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई ( जि. सातारा )

ग्रंथ विक्रेत्यांना २० टक्के कमिशन.

अनुक्रमणिका